## रसिक जनांस प्रार्थना

### आर्या.

श्री [illegible] पद्मरचना धैर्ये सुजां समोर ठेवून ॥
प्रार्थितसें मान्य करा गुणलव असल्यास दोष कळवून ॥ १ ॥

[illegible]जनां पुढे ही कविता जशि भास्करा पुढें वात ॥
शोभे [illegible]तरी भावें ओंवाळिलि मान्य पूजनीं होत ॥ २ ॥

श्रीखंडपायसादी पक्वान्नीं सोडि लावणें चटणी ॥
रुचिवैचित्र्यें रसिकां ग्राह्य तशी व्हावि हे हि लघुकरणी ॥ ३ ॥

नगरत्नहेमकोशीं कळगा जरि तो न योग्य ठेवाया ॥
अल्प हि वस्तू संग्रह करिती मोठे न वदति ती वांया ॥ ४ ॥

विद्वज्जनदृष्टिपुढें विशुद्ध होती च दोष ते नुरती ॥
ओगळ ओढे नाले मिळतां गंगेस शुद्धता वरती ॥ ५ ॥

सज्जनमुखकमलाश्रय करून हें अल्प काव्य लोकांत ॥
पावो मान जसें ते पुष्पाश्रय करून सूत्र हारांत ॥ ६ ॥

प्राकृत कविता म्हणतां मुरडिति किति संस्कृतज्ञ नाकातें ॥
पीयूष दे रुचि बहु कांचनपात्रीं च द्रोणि [illegible] कां तें? ॥ ७ ॥

यांतिल अक्षरपदगणमात्रायत्यादिगत अशुद्धांची ॥
बुध हो क्षमा करावी अवलंबुनि रीति रसिक मधुपांची ॥ ८ ॥

---



## अनुक्रमणिका.

श्रीजगदीशोजयति.

# वाग्विहार.

---

## मंगलाचरण.

### आर्या.

श्रीपरमेश्वर माता तात गुरु संत साधु विबुध गुणी ॥
नमितों पूर्ण कराया मन्मति विद्याविहीन दीन उणी ॥ १ ॥
जनका सर्व जगाच्या विश्वेशा विश्वरूप सुखभवना ॥
श्रीशा वरदा विनती करितों प्रतिभा असो मला कवना ॥ २ ॥
गणितां उपकार जिचें साम्य नये त्रिभुवनांत कोणातें ॥
त्या श्री सौभाग्यवती माय उमेच्या प्रणाम चरणातें ॥ ३ ॥
दीक्षा मुनिसम ज्याची वात्सल्यप्रचुरशुद्धबुद्धि सदा ॥
जो मज कल्पद्रुम त्या प्रणति श्री सोमनाथतातपदा ॥ ४ ॥
शोभवि अद्भुत शिक्षाप्रसाद ज्याचा गुणीं सदाचरणीं ॥
दावी सुखसरणी त्या श्रीगुरुच्या वंदितों सदा चरणीं ॥ ५ ॥
जड मूढ दीन दुर्बळ अधरचिते ही भवार्णवीं तरती ॥
ज्यांच्या बोधतरीनें ते नमितों संत साधु धन्य कृती ॥ ६ ॥
यश ज्यांचें थोर जगीं शुभकार्यीं सर्वदा प्रसन्न मन ॥
पिउनी ज्ञानामृत जे अमरांचि त्यां बुधवरांसि मन्नमन ॥ ७ ॥
तिलकत्वें ज्यांहिं जनीं बहुविध विद्याकलांहिं शोभावें ॥
लोभावें काव्यरसीं त्यां गुणिवर्यांसि वंदितों भावें ॥ ८ ॥

---

पद. ९

[ राग यमनकल्याण; ख्यालाचीधाटी. ]

श्री वरदायका मंगलमूर्ती ॥
गणराज द्यावी मशी सुरस सुधामती ॥ ध्रु० ॥
सिद्धिविनायका, हे ज्ञानसागरा ॥ विघ्नहरा, दयाविद्यांसुखागरा
सुमनानें भावें पुजा करित लदारती ॥ श्रीवरदा० ॥
बोलतसे मुका पंगु चढे गिरी ॥ होय कृपा तुझी करुणाघना ज
वरदान देवो कृपा करनिं जडा हि ती ॥ श्रीवर० ॥
नाम तुझें तरी संसारसागरीं ॥ हे भवनाविका हा दीन उद्धरी
नत दीनबंधो तुला जुळुनि करांप्रती ॥ श्रीवर० ॥
अद्भुत ह्या जगीं लीला तुझी दिसे ॥ पार तिचा विभो वेदास ही
गुणगानिं विश्वंभरा मनुज तिथे किती ॥ श्रीवर० ॥

---

दिंड्या.

नमुन जगदीशा विश्वपालकाला ॥
अनंतैका ब्रह्मांडचालकाला ॥
जगत्सर्गस्थित्यंतकारकाला ॥
अजाऽमर्त्या त्रिभुवनव्यापकाला ॥ १० ॥
लीन होउन मी दीन तत्पदाला ॥
दान मागतसें सुरस कवित्वाला ॥
शिरीं ठेवोनी यशस्वी कराला ॥
बुद्धि द्यावी मज मूढ लेकराला ॥ ११ ॥

---

आर्या

श्री शंकर जगदीश्वर भक्तप्रिय वरद वंदिला भावें ॥

कीं सरसकाव्यमति हें   खाजें मज बालकासि लाभावें ॥ १२ ॥

पद. १३

( राग जिल्हा. ठुंबरीची धाटी )

श्रीविश्वेश्वर विश्वरुपानें नित्य विलोकन हीच पूजा ॥ धृ० ॥
रूपाकृति ज्या नाहिं तयाची मूर्ति मांडुनी देव्हारीं ॥
गंधपुष्पबडिवार करोनी काय पुजावें उपचारीं ॥ श्री० ॥ १ ॥
सर्वव्यापि त्या काय संभवे आवाहन वा आसन रे ॥
हवें कशाला स्नान निर्मळा सुगंधि चंदनलेपन रे ॥ श्री० ॥ २ ॥
स्वयंज्योति त्या काय अपेक्षा दीप निरंजन आरतिची ॥
विश्वंभर जो नित्यतृप्त त्या नको पाकनैवेद्यरुची ॥ श्री० ॥ ३ ॥
यन्मायाकृतिवस्तू रिझवी अनाम कैसें जपीं जपावें ॥
अपार वैभव असे जयाचें विश्वरूपिं त्या लीन असावें ॥ श्री० ॥ ४ ॥

---

## ईशप्रभाव.

श्लोक

आकाशीं सविता दिवा विलसतो रात्रौ शशी तारका ॥
कालीं वर्षति मेघ, भूमि फलते सर्वत्र धान्यादिका ॥
प्राणी चालति बोलती क्षितितलीं त्यां ज्ञानबुद्धी असे ॥
सत्तेनें प्रभुच्या पहा सकल हें ब्रह्मांड चाले कसें! ॥ १ ॥
नाना वृक्षलतांस पल्लवफुलें येती वसंतीं किती ॥
वायू शीतल मंद मंद गतिनीं त्यांच्या सवें क्रीडती ॥
रानीं चोंहिकडे सुगंध सुटती खोरीं दरीं व्यापती ॥
शोभा ही सुखहर्षदायक किती रम्य प्रभूची कृती! ॥ २ ॥
ग्रीष्मीं भास्कर पूर्ण तेज तपुनी ओढे नद्या आटती ॥
द्राक्षाम्रादि रसाल सुंदर फळें नाना पिकूं लागती ॥
आकाशीं ढग नीलवर्ण लसती विद्युद्युति स्फूरती ॥
गर्जोनी जल वर्षतें चहुंकडे सस्यांकुरा हो क्षिती ॥ ३ ॥
हेमंतीं क्षितिपृष्ठ विस्तृत कसें झांकून जातें पहा ॥
ओंब्या, लोंबरिं कंधराच लवल्या सस्यादिकांहीं अहा! ॥
देते जीवन जीवमात्र अवघ्यां जी धान्यसंपत्ति ती ॥
रानोमाळ उदार हर्सित विखरी कीं अन्नपूर्णा क्षिती ॥ ४ ॥
चक्रावृत्ति अनुक्रमें करुनिया निर्वंध पृथ्वीवरी ॥
होती हे सुखद त्रिकाल रविच्या तापें चि संवत्सरीं ॥
सारा हा क्रम साहजीक दिसतो, कौशल्य भारी तरी ॥
स्रष्ट्याचें कळतें तुह्मी जसजसें शोधाल अभ्यंतरीं ॥ ५ ॥
अब्धी थोर अफाट ज्यांत शतशः नौका सदा पोंहती ॥
ज्या माजी जलजंतु मीन सुसरी नक्रादि हे राहती ॥
ज्याच्या खोल विशाल कोशजठरीं रत्नें बहू लाभती ॥
ज्याचें वारि पिऊन मेघ फिरुनी भूमीवरी वर्षती ॥ ६ ॥

अद्री भव्य विशाल तुंग शिखरें नानाकृती शोभती ॥
वेळू चंदन आइनादि बरवीं झाडें नभा चुंबिती ॥
ओढे निर्झर वांकुडे नद नद्या सर्पाकृती वाहती ॥
भेटाया जलधीस जाति म्हणुनी "धों धों" रवें गर्जती ॥ ७ ॥
मैदानें कुरणें सपाट हिरवीं विस्तीर्ण वाळू कुठे ॥
कोठें त्यांत सरोवरें विलसती उत्कृष्ट गावें कुठे ॥
झाडी किर्र अशीं भयंकर वनें ओसाड कोठें गुहा ॥
कोठें रौप्यहिरण्यरत्नमणिच्या खाणी विशाला अहा! ॥ ८ ॥
पक्षी चित्रविचित्र वर्ण नटले नानापरी शोभती ॥
कांहीं सुस्वर मंजु शब्द करिती गाती किती नाचती ॥
विंचू सर्प पतंग भृंग कृमि हे स्वच्छंद हो क्रीडती ॥
हस्ती केसरि वाघ वानर ससे पश्वादि वर्णूं किती ॥ ९ ॥
प्राणी चोंहिकडे अगण्य वसती संचारती भूतलीं ॥
ज्यामाजी मनुजा समान दुसऱ्यां बुद्धी नसे आगळी ॥
जीणें तो सकलेंद्र होउन तयां योजी स्वसेवे वर ॥
यांचें काय! जलाग्निवातचपलासूर्यादि ही चाकर ॥ १० ॥
सिंधू पर्वत वृक्ष आदि करुनी सर्वत्र पृथ्वी वरी
देखावे बहु त्यांत जीव अवघे पात्रें च कीं साजिरीं ॥
प्रेमें आपण सूत्रधार बनुनी जो त्यांजला खेळवी ॥
ऐसा नाटक रूप थाट बरवा प्रेमें प्रभु चालवी ॥ ११ ॥
वर्णी तांबुस शुभ्र शाम पिवळीं रूपें धरी मानुषीं ॥
भाषा प्राकृत संस्कृतादि किति त्या बोले तयांच्या मुखीं ॥
कोळी कर्षक भिल्ल नाविक अशा नानारुपीं कष्टतो ॥
कोठें भूप समर्थ होउन धनी सिंहासनीं राजतो ॥ १२ ॥
कोठें घोर रणें जितून विजयी स्वातंत्र्य हीं भोगितो ॥
कोठें भव्य विचित्र यांत्रिक कला योजून श्री पावतो ॥

कोठें ग्रंथ नवीन नित्य पढुनी विद्येत आनंदतो ॥
कोठें राजमहाल झोंपाडि अशा नाना गृहीं नांदतो ॥ १३ ॥
सर्वांभूति असे कृपाघन असा व्यापून जो राहिला ॥
उत्पत्तिस्थितिनाशविश्वघटनाहेतू च जो जाहला ॥
त्या श्रीशा सकलात्मका सुखकरा सद्भाव ठेवोनियां ॥
ध्यावे ध्यानिं मनीं जनीं निशिदिनीं तल्लीन होवोनिया ॥ १४ ॥

---

षड्गुणैश्वर्य संपन्न ॥ विश्वात्मा सर्व व्यापक ॥
उत्पत्ति स्थिति संहार ॥ कर्ता ब्रह्मांडनायक ॥ १५ ॥
त्या श्रीश श्रेष्ठ पादाब्जीं ॥ हें नमस्कृतिपूर्वक ॥
श्रीशप्रभात नांवाचें ॥ अत्यल्प स्तोत्र अर्पितों ॥ १६ ॥

---

मोह जानेवारी सन १८६६ इसवी.

# ईश्वरमहिमा.

श्लोक

पृथ्वी दिवाकर शशी ग्रह तारकादी ॥
विश्वास ह्या निखिल रक्षक चालकादि ॥
स्थित्यादि रूप नसतां हि चराचराला ॥
निर्मी; प्रणाम मम त्या परमेश्वराला ॥ १ ॥
होतां प्रभात रवि ये उदया चलाला ॥
दे श्री प्रकाशमय जो अवघ्यां स्थलांला ॥
सोनेरि रंग चढवी जणुं चित्रकार ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ २ ॥
पर्जन्य-उष्ण-हिम काळ अनुक्रमानें ॥
होती निशा दिवस नित्य हि त्याच मानें ॥
चाले कसें सतत हें ऋतुचक्र थोर ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ ३ ॥
सिंधू सरोवर नद्यादिक यांमधून ॥
होऊन वाफ जल जाय नभीं उडून ॥
होई पुन्हा विपुल वर्षुन मेघ नीर ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ ४ ॥
अग्न्यूदकीं सतत वैर परस्परांत ॥
राहे तथापि घनविद्युत अंबरांत ॥
स्नेहें पहा बहु बरे करिती विहार ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ ५ ॥
चंद्रोदयास्त समयीं भरती अथाग ॥
अब्धीस उंच चढते जणु तो नतांग ॥
होऊन त्यास विनवी बडवामि वार ॥

देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ ६ ॥
या वृक्षवल्लरि अहा! ऋतु उष्ण काळीं ॥
पाण्या विना फुटति पालवती सुकाळीं ॥
पुष्पें फळें रुचिर त्यांवर येति फार ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ ७ ॥
तोडून अल्प तुकडा तरुचा तयास ॥
भूमींत वा तरुवरी च हि लाविल्यास ॥
त्या पासुनी पुनरपी तरु हो तयार ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ८ ॥ ॥
पाषाण जीवन वनस्पति माति धातू ॥
रत्नादि त्या किति तरी उपयुक्त वस्तू ॥
सृष्टींत ह्या विलसती बहु सर्व दूर ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ ९ ॥
जे सृष्टवस्तुगुण भिन्न परस्परांत ॥
त्याहून अन्य बनती बहु मिश्रणांत ॥
अत्यंत सुंदर मनोरम हे विकार ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ १० ॥
पृथ्व्यापतेजपवनादिक पंचतत्वें ॥
निर्जीव एकवटुनी च सजीवनत्वें ॥
प्राणी अहा! विलसती बरवे रुचीर ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ ११ ॥
प्राणी अनंत धरणीवर राहताती ॥
सौख्यांत ते फिरति बोलति पाहताती ॥
नानाकृती विविध वर्ण हि जाति फार ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ १२ ॥
प्राण्यांत सर्व असती नरनारि जोडे ॥

प्रेमा परस्पर किती उभयांत जोडे ॥
एकास होय दुसरा अति मोहणार ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ १३ ॥

प्रेमें बहूत रमती नरनारि जीव ॥
संयोगजन्यफल बालक हो प्रभाव ॥
उत्पत्तिचा किति विलक्षण हा प्रकार ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ १४ ॥

रूपांतरें अति विचित्र परोपरींचीं ॥
होती विलक्षण अळ्यादिक कीटकांचीं ॥
तज्जन्य भिन्न फुलपांखरूं रम्य फार ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ १५ ॥

व्हावें पुढें अचुक पोषण बालकांचें ॥
या साठिं आधिं जननीस्तनिं दुग्ध साचे ॥
हो विश्वपोषण अशा परि सर्व थोर ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ १६ ॥

कल्याण पोषण सदा निज बालकांचें ॥
व्हावें म्हणून पितरें झटतात साचें ॥
प्राण्यांत मोह ममता किति हा विचार ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ १७ ॥

कोणास भक्ष्य मिळतें श्रम केलियानें ॥
कोणास तेंच सहजीं हि विना श्रमानें ॥
सारांश भक्ष्य अवघ्यांस मिळेचि थोर ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ १८ ॥

ती योग्य देहरचना बघतां सुरम्य ॥

कौशल्य थोर किति! तें मतितें अगम्य ॥
चाले घड्याळ च; अकृत्रिम हा प्रकार ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ १९ ॥

सर्वत्र ही अवयवीं जरि साम्य आहे ॥
भिन्नत्व तें किति तरी स्वरुपांत पाहें ॥
एकासि एक न मिळे मुख वा शरीर ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ २० ॥

हीं माणसें असुनि एकचि देहधारी ॥
बुद्धीकलामतिबलें कमजास्त सारीं ॥
कोणी गुणी गरिब सेवक नाथ थोर ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ २१ ॥

हेवा धरून ह्रदयीं नृप आपणांत ॥
युद्धें महा झगडती समरांगणांत ॥
होतो जयापजय तें सुकृतानुसार ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ २२ ॥

संसारिं ह्या सुखविलास अनंत भोगी ॥
कोणी पराङ्मुख तयांस अशक्त रोगी ॥
कोणी सुखें सकल मानिति हीं असार ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ २३ ॥

शस्त्रास्त्रपात्रवसनादि परोपरीच्या ॥
वस्तू अनंत बरव्या सुखजीवनाच्या ॥
केल्या किती करिति हा मनुजीं प्रचार ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ २४ ॥

गाड्या विशाल गिरण्या जलयान यंत्रें ॥
सारीं पहा सरळ चालति एक तंत्रें ॥
वाफेंत शक्ति किति हे नरबुद्धि थोर! ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ २५ ॥

विद्युल्लता त्वरित पोंचविते निरोप ॥
वाद्यें हवा सुरस वाजविते उमोप ॥
चित्रें लिही बनुनियां रवि चित्रकार ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ २६ ॥

प्राणी कसे विचरती जंव जीव आहे ॥
येतांचि मृत्यु अवघा व्यवहार राहे ॥
जीवित्वमृत्युकळसूत्र अगम्य सैर ॥
देवा, तुझाचि महिमा दिसतो अपार ॥ २७ ॥

---

## पद

प्रभुगुणमहिमा गा ॥ प्राण्या, प्रभुगुणमहिमा गा ॥ धृ० ॥
स्वेच्छेनें ह्या निर्मुनि बरव्या ॥ रक्षी थोर जगा ॥ प्रा० ॥ १ ॥
लीलेनें पशु चालवि धरणीं ॥ उडवी व्योमिं खगां ॥ प्रा० ॥ २ ॥
वसंतिं उदका वांचुनि फुलवी ॥ फळवी वल्लि अगां ॥ प्रा० ॥ ३ ॥
समयीं वृष्टी वर्षुन सस्यें ॥ शोभवि भूमि नगां ॥ प्रा० ॥ ४ ॥
॥ २८ ॥

---

## आर्या

श्रीमंत 'सर'पदांकित के. सी. एस. आय. थोर सरदार ॥
काशी राव विभूषित दादा साहेब होळकर नृवर ॥ २९ ॥

ज्यांची श्रीपरमेश्वरगुणलीलावर्णनीं मति प्रचुर ॥
प्रकटे अभंगरूपें ते प्रेमळ भक्ति केशवी मधुर ॥ २० ॥

मुख्यत्वें त्यांच्या ह्या ग्रंथाहुनि सुगुणांस त्यांस अल्पतर ॥
हे ईश्वरमहिमा कृति परमप्रीत्यादरें करीं नजर ॥ २१ ॥

---

डिसेंबर सन १८७९ इसवी

# श्रीजगदीशप्रार्थना

## अभंग

श्रीमुख वत्सरीं ॥ भाद्रपद मासीं ॥
शुक्ल चतुर्दशी ॥ शुक्रवारीं ॥ १ ॥
मनोभावें पूजा ॥ अनंता अर्पून ॥
आनंदांत जन ॥ होते बहू ॥ २ ॥
रात्र दहा घडी ॥ लोटुनियां गेली ॥
गडबड झाली ॥ एका एकीं ॥ ३ ॥
भूपतीस ज्वर ॥ चढोनिया फार ॥
जिवा क्लेश थोर ॥ देऊं लागे ॥ ४ ॥
वार्ता ही ज्वराची ॥ सर्व शहरांत ॥
पोंचे अकस्मात ॥ भयंकर ॥ ५ ॥
क्लेश ते ऐकून ॥ घाबरले जन ॥
रात्र ती दारुण ॥ भासूं लागे ॥ ६ ॥
आप्त इष्ट मित्र ॥ सोयरे धायरे ॥
गण गोत सारे ॥ जमा झाले ॥ ७ ॥
अमीर उम्राव ॥ थोर सरदार ॥
सर्व एहेल्कार ॥ गोळा झाले ॥ ८ ॥
ऐसे सर्व लोक ॥ धांउनिया आले ॥
प्रासादीं बैसले ॥ राजा पाशीं ॥ ९ ॥
प्रकृति रावाची ॥ पाहुनी बेफाम ॥
त्यांचें धैर्य धाम ॥ हालूं लागे ॥ १० ॥
स्थिति ही पाहून ॥ विस्मित ते झाले ॥

तोंडींचें पळालें ॥ पाणी त्यांच्या ॥ ११ ॥

औषधी उपाय ॥ बहु चालू झाले ॥
दान धर्म केले ॥ गरीबांना ॥ १२ ॥

तोडगे उतारे ॥ नवस ते केले ॥
विप्र बैसविले ॥ अनुष्ठाना ॥ १३ ॥

जे जे कांहीं कोणा ॥ उपाय सुचले ॥
ते ते त्यांनीं केले ॥ प्रेमभावें ॥ १४ ॥

वेळा ही भीतीची ॥ टळावी म्हणून ॥
देवाचें स्तवन ॥ केलें बहू ॥ १५ ॥

स्तव नाना परी ॥ केला जो लोकांनीं ॥
गातो तो पद्यांनीं ॥ ऐका आतां ॥ १६ ॥

---

श्लोक

श्री जगत्पते, प्रार्थितों तुम्हां ॥
दीन बालकें, सौख्य द्या अम्हां ॥
सत्वरी बरें राजया करा ॥
हें चि मागतों दान शंकरा ॥ १७ ॥

माय बाप तूं बंधु सोयरा ॥
तूं चि आमुचा सर्व आसरा ॥
दुःख नाशि दे सौख्य लेंकरा ॥
हें चि मागतों दान शंकरा ॥ १८ ॥

घोर रात्र हे कीं निशाचरी ॥
त्वत्कृपाश्रयें लोटुनी वरी ॥
सौख्य तें मिळो पूर्ण किंकरा ॥

हें चि मागतों दान शंकरा ॥ १९ ॥

कालसर्प हा दुष्ट मातला ॥
शक्त गारुडी तूं च त्याजला ॥
घाल वेसणी वार पामरा ॥
हें चि मागतों दान शंकरा ॥ २० ॥

कोप सोडुनी धांव लौकरी ॥
गायशी दयावंत बांसरीं ॥
भूप तारुनी वारिं त्या ज्वरा ॥
हें चि मागतों दान शंकरा ॥ २१ ॥

हे कृपाघना विश्वपालका ॥
प्रार्थुनी तुला मारितों हंका ॥
धांव धांव बा जोडितों करा ॥
हें चि मागतों दान शंकरा ॥ २२ ॥

काय आमुची हांक ही तुला ॥
ऐकुं येइना भक्तवत्सला ॥
ऐक ऐक बा सौख्यसागरा ॥
हें चि मागतों दान शंकरा ॥ २३ ॥

दीनतारका, आपणा विणें ॥
संकटीं करी कोण धांवणें ॥
शांति देउनी यातना हरा ॥
हें चि मागतों दान शंकरा ॥ २४ ॥

## साक्या

देवा, धांवा ऐकुनि सत्वर रक्षण कर राजाचें ॥

होतें आम्हां दुःख मनीं बहु पाहुनि असौख्य त्याचें ॥ २५ ॥
कृपाघना कर जोडुनि नमितों वर्षुनि करुणावारी ॥
सत्वर अमुच्या राजाचा वा ज्वर दावानल वारीं ॥ २६ ॥

दासांचीं बहु थोर संकटें वाहुनियां थकलाशी ॥
म्हणून आतां प्रभो यावया उशीर हा लावीशी ॥ २७ ॥

अथवा निशिचा समय म्हणोनी करशी कानाडोळा ॥
ठीक; नको तूं येऊं; तिथुनचि फिरवीं मार्गे काळा ॥ २८ ॥

अथवा तुजला झोंप लागली म्हणून अमुची हांक ॥
ऐकाया अवकाश लागला ऊठ झोंप ती हांक ॥ २९ ॥

शरण येउनी दीन मागतों प्रभुराया धांवावें ॥
बाळ मुलांची पुरवावी ही तापदुःख वारावें ॥ ३० ॥

## अभंग

दान मागतों हें देवा ॥ राव तुकोजी ऊठवा ॥ ३१ ॥
दीनांवरीं दया करीं ॥ ज्वर भूपतीचा हरीं ॥ ३२ ॥
येतों तुज काकुळती ॥ द्यावी नृपा सौख्य शांती ॥ ३३ ॥
शरण आलों देवा तुज ॥ राखीं आमुची बा लाज ॥ ३४ ॥
ऐक दीनाची अरोळी ॥ राव तुकोजी सांभाळीं ॥ ३५ ॥
दीनवाणी विनवितों ॥ नृपा आरोग्य मागतों ॥ ३६ ॥
कृपा करोनी किंकरीं ॥ हस्त ठेवीं भूपशिरीं ॥ ३७ ॥
तुला येऊंदे करुणा ॥ दीनदासउद्धरणा ॥ ३८ ॥
नको मानूं बा वांकडें ॥ वारीं भूपाचें सांकडें ॥ ३९ ॥
धांव पाव देवराया ॥ सौख्य भूपातें द्यावया ॥ ४० ॥
किति कौतुक पाहशी ॥ जीव होतो कासाविसी ॥ ४१ ॥

महा ज्वर हा जाळितो ॥ तूज वैद्या बोलावितों ॥ ४२ ॥
द्यावी कृपाचूर्ण गोळी ॥ नाशीं ज्वरातें समूळीं ॥ ४३ ॥
सर्वदुःखनिवारणा ॥ तूज येऊंदे करुणा ॥ ४४ ॥
भक्तवत्सल बोलिले ॥ ब्रीद राखीं तें आपुलें ॥ ४५ ॥
किती पाहतोसी अंत ॥ ज्वरें मांडिला आकांत ॥ ४६ ॥
राण्या आणि युवराज ॥ सर्व बाहताती तूज ॥ ४७ ॥
त्यांची येऊंदे बा दया ॥ कृपाघना देवराया ॥ ४८ ॥
सर्व विश्वाच्या पालका ॥ आह्मां सुखवीं बालकां ॥ ४९ ॥
सर्वसाक्ष तूं देखणा ॥ केंवि दुःख हें दिसेना ॥ ५० ॥
सर्व जाणता होउनी ॥ दुःख कां हें नये मनीं ॥ ५१ ॥
समदृष्टी तूं बोलती ॥ मग कां ही ऐसी कृती ॥ ५२ ॥
दयावंत तुझें नांव ॥ दूर कां तो सौख्यठाव ॥ ५३ ॥
ज्वर दुष्ट हा दारुण ॥ वारी कोण तूजवीण ॥ ५४ ॥
प्रजापालनीं तत्पर ॥ भूपा आयु द्यावें चिर ॥ ५५ ॥
योगी तुझी लीला गाती ॥ धांव घालिशी संकटीं ॥ ५६ ॥
आह्मां त्याचा अनुभव ॥ द्यावा उठवोनी राव ॥ ५७ ॥
देवा करीं उपकार ॥ नृपाऽरोग्य दे सत्वर ॥ ५८ ॥
दीन ध्यातों सर्वेश्वरा ॥ भूपतापभीति हरा ॥ ५९ ॥
शरण आलों प्रभो दीन ॥ दावीं आह्मां तो सुदिन ॥ ६० ॥
तुला घालितों हा भार ॥ करीं राजातें सुस्थिर ॥ ६१ ॥
नाम तुझें गुणकारी ॥ ज्वरशत्रूतें संहारीं ॥ ६२ ॥
ज्वर खळातें दंडून ॥ करीं राजाचें पालन ॥ ६३ ॥
तुझी कृपा स्नेहरूप ॥ पाजळो हा राज्यदीप ॥ ६४ ॥

शिपीं कृपेचें बा आप ॥ वाढो कल्पवृक्ष नृप ॥ ६५ ॥
भक्तसंकटें दुर्धर ॥ वारितोसी थोर थोर ॥ ६६ ॥
ऐशी तुझी कीर्ति गाती ॥ म्हणून येतों काकुळती ॥ ६७ ॥
दुर्योधनाच्या सभेसी ॥ साह्य केलें द्रौपदीसी ॥ ६८ ॥
पांडवांतें राज्यासन ॥ दिलें कष्ट त्वां सोसून ॥ ६९ ॥
नक्रें गजेंद्रा ग्रासिलें ॥ त्यासि शीघ्र सोडविलें ॥ ७० ॥
शंखासुर तो मातला ॥ वेद घेवोनियां गेला ॥ ७१ ॥
मत्स्यरूप तें घेतलें ॥ त्यासि तूर्ण संहारिलें ॥ ७२ ॥
भक्त प्रल्हादा कारणें ॥ स्तंभीं केलें प्रकटणें ॥ ७३ ॥
दुष्ट काळिया मर्दिला ॥ दिलें सौख्य गोकुळाला ॥ ७४ ॥
ऐसे प्रसंग ते किती ॥ दाऊं तूज जगत्पती ॥ ७५ ॥
सर्व तूं ते जाणतोसी ॥ नको सांगणें बा तुशी ॥ ७६ ॥
त्यांच्याहुनी हें संकट ॥ असे तूज का बिकट ॥ ७७ ॥
प्रेमपूर तो येऊंदे ॥ दुःख वाहुनी जाऊंदे ॥ ७८ ॥
हें चि मुख्य बा मागणें ॥ भूपताप निवारणें ॥ ७९ ॥

पद

( राग मल्हार मिश्रित देस )

जगदीशा करुणा येऊंदे दीनांची ॥
लवलाही सुटका होऊंदे भूपाची ॥ ध्रु० ॥
ऐकुनी वार्ता रायाच्या ज्वराची ॥
तोंडें बा सुकलीं तव दासजनांचीं ॥
तुजपाशीं धांव सर्वांच्या मनांची ॥
नोहे ही वेळा अंत पाहण्याची ॥ ज० ॥ १ ॥
दुःख हें जिवींचें कोणाला सांगावें ॥
तुजवीण कोणा तरी शीणवावें ॥

आलों बा शरण पदरांत घ्यावें ॥
वारुनी तापा नाम गाजवावें ॥ ज० ॥ २ ॥
नवनीताहूनी मऊ जें मानस ॥
कठोर बा तें आज कां केलेंस ॥
ममतेचा द्रव येवो त्वद्दयास ॥
करूं नको आतां सेवकांचा त्रास ॥ ज० ॥ ३ ॥
ह्मणताती तुजला दीनांचा कैवारी ॥
अवकृपा कां ही ऐसी दीनां वरी ॥
वाट पाहावी देवा कोठवरी ॥
धांवोनी येणें आतां झडकरी ॥ ज० ॥ ४ ॥

॥ ८० ॥

## पद

( राग जोगी )

देवा, सत्वर भूपतिच्या ॥ वारीं क्लेशाला ॥ ध्रु० ॥
भूपगजेंद्रा व्याधिनक्र हा ॥ देतो पीडा दुष्ट महा ॥
धांउनि निरसा ही जनहा ॥ सर्व पहा शरण तुला ॥ दे० ॥ १ ॥
भक्तवत्सला, दीनपालका, ॥ काढुन करुणस्वर बहु हांका ॥
मारित असतां कारुणिका, ॥ विलंब कां लावियला ॥ दे० ॥ २ ॥
सर्वांचा तूं मायबाप ॥ होउन कां हा प्रभुला ताप ॥
जाळीं अवघें दुःसह पाप ॥ सौख्य अमाप देईं मुलां ॥ दे० ॥ ३ ॥
वारुनि संकट हांके सरशी ॥ दीनांचें तूं रक्षण करिशी ॥
कोप असा कां आजच धरशी ॥ कां रुसशी घननीला ॥ दे० ॥ ४

॥ ८१ ॥

पद

( राग सोहनी-परज )

टाळीं वा क्लेश प्रसंग ॥ प्रभु, ज्वर हा भंग ॥ ध्रु० ॥
मानुनी चंदन भूपशरीरीं ॥ चढतो कीं थोर भुजंग ॥ प्र० ॥ १
कोमलनृपतनुसौख्यगृहा हा ॥ केवळ पावकसंग ॥ प्र० ॥ २ ॥
निज साह्याला घेउनि वायू ॥ बहुविध करितो ढंग ॥ प्र० ॥ ३ ॥
क्षणोक्षणीं तुजला हीच विनंती ॥ सौख्यांत नृप हो दंग ॥प्र० ॥ ४ ॥

॥ ८२ ॥

पद

( राग जिल्हा )

ज्वर हा घोर निवार ॥ प्रभुजी, ज्वरहा घोर० ॥ ध्रु० ॥
भूपतनाला प्रजामनाला ॥ जाळितसे अनिवार ॥ प्र० ॥ १ ॥
दुःखसागरीं कर्णधार तूं ॥ आह्मां उतरीं पार ॥ प्र० ॥ २ ॥
प्राणसख्या, तुज वांचुन दासां ॥ नाहिं दुजा आधार ॥ प्र० ॥ ३
प्रणतवत्सला, अंत नको बघूं ॥ झालों बहु लाचार ॥ प्र० ॥ ४ ॥

॥ ८३ ॥

पद

( राग कालिंगडा )

देईं सौख्य नृपा ॥ प्रभुजी, देईं सौख्य नृपा ॥ ध्रु० ॥
मंगलधामा, ताप निवारुन ॥ ठेवीं नित्य कृपा ॥ प्र० ॥ १ ॥
वारिं उपाधी ज्वरत्राताची ॥ राखीं राज्यदिपा ॥ प्र० ॥ २ ॥
तव पदकमलां वांचुन नमिळे ॥ सुख दासां मधुपां ॥ प्र० ॥ ३ ॥
जगदुदारा, शरण पदीं तव ॥ मेणीं अन्य जपा ॥ प्र० ॥ ४ ॥

॥ ८४ ॥

आरती

जय देव जय देव जय श्री जगदीशा ॥
आरती ओंवाळूं प्रभुक्लेशनाशा ॥ ध्रु० ॥

समयोचितवर गर्जुन हे करुणाघना ॥
तोषविसी शरणागत भाविक मयुरांना ॥
ऐकुनियां दिनांची प्रभु तूं प्रार्थना ॥
वारिल्या भूपाच्या अवघ्या यातना ॥ ज० ॥ १ ॥

दीनदयाळा तुजला प्रेमें आळविलें ॥
त्या सरसें मन तूझें कोमळ कळवळलें ॥
संकट वारायास्तव धावणें केलें ॥
सत्वर आमुच्या वा दुःखा पळवीलें ॥ ज० ॥ २ ॥

देवा, दीनांवरी बहु केले उपकार ॥
भूपासें सुख दिधलें वारुनिया ज्वरभार ॥
निर्वाणीं सकळांचा तूं चि वा आधार ॥
वर्णावा किति महिमा तूझा अपरंपार ॥ ज० ॥ ३ ॥

देवा, अखेर आतां हे ची विनवणी ॥
रक्षीं चिर युवराजांसह राजाराणी ॥
सर्वोपरी सुख उत्तम लाधो पिकपाणी ॥
भावें विष्णुदास नत जोडुन पाणी ॥ ज० ॥ ४ ॥
॥ ८५ ॥

---

## आर्या

आगर पूर्ण सुखांचें निखिल गुणांचें अवर्ण्य अधिकरण ॥
सच्चिद्घनविश्वंभर जो निज भक्तापदा करी हरण ॥ ८६ ॥
त्या श्रीशपदीं श्रीमन् नृपवर्य तुकोजिराव होळकर ॥
यांच्या आरोग्यास्तव अर्पित हे प्रार्थना रमो सुचिर ॥ ८७ ॥

---

आगस्ट सन १८७२ इ०.

# आरोग्यानंदप्रदर्शन.

श्लोक

श्रीविश्वेश्वर भक्तवत्सल दयासिंधो प्रभो शंकरा ॥
केली थोर कृपा अहा सुदिन हा त्वां दाविला किंकरा ॥
गावे हे उपकार काय किति बा बुद्धी न कीं लेंकरा ॥
देवा ठेविं सदा अशीच करुणा ही प्रार्थना स्वीकरा ॥ १ ॥

पद

( राग जिल्हा झिंजोटी )

आजि सकल जन सुदिन बोलती ॥
करिति महोत्सव मंगल गाती ॥ ध्रु० ॥
धन्य धन्य प्रभु राव तुकोजी ॥
भाग्यवंत गुणनिधान गाजी ॥ आ० ॥ १ ॥
विनय सुनीति न्यायनिपुणता ॥
ख्यात जनीं तव राजकार्यता ॥ आ० ॥ २ ॥
कुलदीपच नृपवंशसंभवीं ॥
सुखें नांद ऐश्वर्यवैभवीं ॥ आ० ॥ ३ ॥
भाग्योदय तव भावत सकलां ॥
मित्रोदय जणु हर्षद कमलां ॥ आ० ॥ ४ ॥
विजयश्री तव सबल भरारो ॥
शौर्यें तव रिपु विरुन थरारो ॥ आ० ॥ ५ ॥
सार्थ तुकोजीराव नांव तव ॥
प्रेमें करितां सज्जन गौरव ॥ आ० ॥ ६ ॥

चिरंजीव तूं चिरंजीव तूं ॥
पूर्ण होत तव सकल हि हेतू ॥ आ० ॥ ७ ॥

शरीर निरामय सुख सर्वोपरी ॥
देवो प्रभुवर विनति पंत करी ॥ आ० ॥ ८ ॥

पद

( राग जिल्हा )

थोर तुझे उपकार ॥ देवा, थोर तुझे उपकार ॥ ध्रु० ॥
प्रेमें पालण पोषण करिशी ॥ पुरविशि हेतु अपार ॥ दे० ॥ १ ॥
धन्य प्रभो, अभिमान राखिला ॥ केला जयजयकार ॥ दे० ॥ २ ॥
समयीं दासां लागीं पावलां ॥ काय दया अनिवार ॥ दे० ॥ ३ ॥
सदैव नांदो भाग्यवंत नृप ॥ कुटुंबसहपरिवार ॥ दे० ॥ ४ ॥
उपकृतिमहिमा वर्णाया किति ॥ लघुमतिला अधिकार ॥ दे० ॥ ५ ॥

---

सप्टेंबर सन १८७३ इ०

## नरजन्मधन्यता.

श्लोक

अगाध लीला जग धन्य यत्कृती ॥
नमस्कृती त्या परमेश्वराप्रती ॥
करोनि दासा वरती प्रसाद या ॥
सुबुद्धि देवो कविता करावया ॥ १ ॥

सदैव सप्रेम निमग्न राहुनी ॥
प्रमोदवीं मातृपित्यास सेवानीं ॥
गुरूजनीं सेवक सभ्य शोभला ॥
मनुष्य तो धन्य जगांत जन्मला ॥ २ ॥

सुनीतिनें वागतसे सदा जनीं ॥
परोपकारोत्सुकता वसे मनीं ॥
घनापरी भूतदयेंत रंगला ॥
मनुष्य तो धन्य जगांत जन्मला ॥ ३ ॥

रिपूंस मित्रांस समान मानितो ॥
सुभाषणें सर्व जनांसि बोलतो ॥
स्वभाव ही लीन कुलीन चांगला ॥
मनुष्य तो धन्य जगांत जन्मला ॥ ४ ॥

कुमार्ग लाभास्तव ही न आचरी ॥
सुयुक्त तें अन्य जनांस वीतरी ॥
कुसंगतीनें न कधीं विटाळला ॥
मनुष्य तो धन्य जगांत जन्मला ॥ ५ ॥

उगा रिकामा कधि ही न बैसतो ॥
सदुद्यमीं काल सदैव वेंचितो ॥

न दुष्ट ऐशा विषयांत रंगला ॥
मनुष्य तो धन्य जगांत जन्मला ॥ ६ ॥

शिरीं न विद्यामदभार घेतसे ॥
घडेल तें साह्य परांस देतसे ॥
सुबोध ज्याच्या हृदयांत बिंबला ॥
मनुष्य तो धन्य जगांत जन्मला ॥ ७ ॥

विलोकितां साधु विनम्र होतसे ॥
न आंगिं औद्धत्य लवांश ही वसे ॥
धनाभिमानें न उगीच मातला ॥
मनुष्य तो धन्य जगांत जन्मला ॥ ८ ॥

स्वयें सुखी अन्य सुखी विलोकुनी ॥
तसाच दुःखी परदुःख ऐकुनी ॥
स्वभाग्यसौख्यांत न धुंद जाहला ॥
मनुष्य तो धन्य जगांत जन्मला ॥ ९ ॥

घडो स्वहस्तें न च वावगें कधीं ॥
असें सदा वागवितो मनामधीं ॥
षट्शत्रु-पाशांतुनि मुक्त जाहला ॥
मनुष्य तो धन्य जगांत जन्मला ॥ १० ॥

निजस्तुती ऐकुनियां न हर्षतो ॥
विषादनिंदास्पद हीं न बोलतो ॥
करी विचारें व्यवहार साधला ॥
मनुष्य तो धन्य जगांत जन्मला ॥ ११ ॥

विचारविद्यागुणवंत जाणता ॥
प्रबुद्ध चातुर्यनियुक्त वागता ॥
वदान्य विख्यात सुधा सुधारला ॥

मनुष्य तो धन्य जगांत जन्मला ॥ १२ ॥

स्वधर्मजातीकुलदेश या विशीं ॥
वसे जयाच्या अभिमान मानसीं ॥
पुसे स्वकीयां निज वैभवीं भला ॥
मनुष्य तो धन्य जगांत जन्मला ॥ १३ ॥

समुद्रसा शांत कशाहि संकटीं ॥
नगेंद्रसा धीर विराजतो भटीं ॥
धनांबुशी निर्मल कीर्ति पावला ॥
मनुष्य तो धन्य जगांत जन्मला ॥ १४ ॥

कृतज्ञता सद्व्यय पापभीरुता ॥
सहिष्णुता सत्यकृती दयालुता ॥
अशा अशा सद्गुणरत्नि शोभला ॥
मनुष्य तो धन्य जगांत जन्मला ॥ १५ ॥

असार संसारसुखीं न रंजतो ॥
स्वधर्मभक्तीं कुलरीति पाळितो ॥
अहर्निशीं श्रीशगुणांत रंगला ॥
मनुष्य तो धन्य जगांत जन्मला ॥ १६ ॥

पद

( राग जिल्हा )

धन्य जगीं जन्मला ॥ तो नर धन्य जगीं० ॥ ध्रु० ॥
निष्कपटत्वें सर्व जनांला ॥ प्रेमें आवडला ॥ तो० ॥ १ ॥
परधनदारा विषसम मोजुन ॥ संसारीं रमला ॥ तो० ॥ २ ॥
प्राप्तस्थितितें उत्तम मानुनि ॥ हर्षें अनुसरला ॥ तो० ॥ ३ ॥

मितभाषण मितभोजन नियमित ॥ कामें करूं शिकला ॥तो० ४ ॥
सद्विद्येनें विश्वगुणीं रत ॥ राहुनि भव तरला ॥ तो० ॥ ५ ॥
॥ १७ ॥

---

आर्या

श्रीमंत भाग्यशाली प्रसिद्ध आर्यप्रभात्र रविबिंब ॥
कुलसंपूज्य विनायक रात्र किबे उर्फ रावसाहेब ॥ १८ ॥

स्वाश्रितजनपरिपालन गुणिजनगौरव यथार्थ सन्मानीं ॥
सत्कार याचकांचा प्रेमपुरःसर सदैव धनदानीं ॥ १९ ॥

इत्यादि भूषणास्पद सुगुणीं यांच्या रिझून यांना हे ॥
नरजन्मधन्यताकृति समर्पिली नम्रतादरोत्साहें ॥ २० ॥

---

मार्च सन १८७८ इसवी.

# स्वतंत्रता.

### आर्या

श्रीशा वंदन करितों जो सुखदायक अनादि गुरुतात ॥
भासे पदार्थ मात्रीं लीलाकृतिनें स्वतंत्र जगतांत ॥ १ ॥
महिमा अगाध आहे स्वतंत्रतेचा जगांत सर्वत्र ॥
यास्तव या देवीचें गातों परिसा लहानसें स्तोत्र ॥ २ ॥
पशुपक्ष्यादिक अज्ञ हि इच्छिति वागावया निजच्छंदें ॥
स्वातंत्र्य तें न कां प्रिय सज्ञ मनुष्यां गमो सुखानंदें ॥ ३ ॥
ज्या ज्या देशावरती या देवीचें असेल हो राज्य ॥
तेथें न कोणत्याही गोष्टीची कीं उणीव अविभाज्य ॥ ४ ॥
ज्या देशीं विजयध्वज वैभवशाली हिचा सदा फडके ॥
तद्देशीय जनांची बुद्धिमता बहु विशालतेस झुके ॥ ५ ॥
उपसर्ग कांहिं नसतां वेल उफाडे जशी वनीं रमणी ॥
तैशी वाढ अकुंठित असते त्यांच्या सुबुद्धिची सुगुणीं ॥ ६ ॥
विषयांत पाहिजे त्या घाला त्यांना हि कोणत्या शास्त्रीं ॥
होती प्रवीण विशारद त्यांत जसें सुजल रंग वारिं गात्रीं ॥ ७ ॥
नानापरिचीं शास्त्रें शोधिति निर्मिति कलाहि विविध नव्या ॥
सारांश बुद्धि त्यांची परिपक्व स्थितिस पावते बरव्या ॥ ८ ॥
रिपुकरगत झाल्या वर संशय जीवित्व मूळ जें त्याचा ॥
विस्मय कशास मग त्या लयास विद्याकलादि गेल्यांचा ॥ ९ ॥
यास्तव देशा मध्यें स्वतंत्रता अति अवश्य मुख्य खरी ॥
ती देश नांवरूपा आणी चढवी सुधारणाशिखरीं ॥ १० ॥
थोर पराक्रमशाली विक्रम राजादि भूप असतांना ॥
हा देश कोणत्या हो स्थानीं होता मनांत तें आणा ॥ ११ ॥

त्या कालीं सर्वोत्तम झाले बहु कीर्तिमान कवि धन्य ॥
अद्यापि साक्षि ज्यांचीं देती काव्यें रसाल जगमान्य ॥ १२ ॥
ज्या सर्व देशभाषा चालति त्यांच्यांत अग्रगण्य असे ॥
ती संस्कृतभाषा अति सुधारली जी समान अन्य नसे ॥ १३ ॥
संपन्न देश झाला आला उदया उदीम ही त्यांत ॥
आलीं नानापरिचीं शास्त्रें विद्या कला प्रचारांत ॥ १४ ॥
त्या सत्कवि नवरत्नीं नव्हते केवळ कवीच हो नुसते ॥
नाना शास्त्रविशारद पंडित वैदिक हि ते किती होते ॥ १५ ॥
परिसा आतां दुसरा लाभ महा तो "सुधर्मवृद्धि" अहा! ॥
जी जनकर्तव्यांतिल मुख्य जणों अवयवांत शीर पहा ॥ १६ ॥
सुविचारशक्ति वर्धन होतां होते प्रवृत्ति लोकांची ॥
परमेश्वराकडे त्या व्यापी सर्वत्र भासते ज्याची ॥ १७ ॥
सदसद्धर्ममतांचा विचार करण्यास गावतो वेळ ॥
तेणेकरून मोडे खोट्या समजूतिचें महा खूळ ॥ १८ ॥
देशावरती कधिंही न देवभोळेपणाभ्रतम येत ॥
कारण तन्नाशक तें स्वतंत्रतारवि असे सदा उदित ॥ १९ ॥
तिसरा लाभ असा कीं निपजति योद्धे महा महा शूर ॥
जे देशबांधवांच्या करिती परतापयातना दूर ॥ २० ॥
समरांगणांत रिपुशीं देउन छातीस छाति हे वीर ॥
रणरंगधीर भिडती शौर्यें त्याच्यांत नुरविती धीर ॥ २१ ॥
जेरीस त्यांस आणुनि करितातचि कांहिं नाहिंसा थारा ॥
होतें मग त्यां रिपुला पुरेपुरेंसें करीत पोबारा ॥ २२ ॥
एका शिवाजिनें त्या हिंदूपदबादशाहि अद्भूत ॥
शौर्यें स्थापन केली देश महाराष्ट्र आपुला त्यांत ॥ २३ ॥
मग काय काय केले देशानें ह्या पहा पराक्रम ते ॥

जेरीस आणिले अति यवन महा दुष्ट गांजिते रयते ॥ २४ ॥
जो हिंदुधर्म अगदीं प्राबल्यें सार्वभौम यवनांच्या ॥
स्थिति बिघडुनि बेतांत चि आला होता लयास जाण्याच्या ॥ २५ ॥
त्याचें पुनरुज्जीवन देउनियां परपराजयौषधिला ॥
करुनी आणियलें त्या पूर्वीच्या उत्तमोत्तम स्थितिला ॥ २६ ॥
त्याने स्वनाम विजयी सर्व भरतखंडभर च काय पण ॥
दुरदुरच्या देशीं ही गाजविलें मिरविलें हि थोरपण ॥ २७ ॥
फोडून दिल्लिपतिचें तख्त असे जळजळाट अति ज्याचा ॥
अटकेवर फडकविला भगवा झेंडा शिवाजि राजाचा ॥ २८ ॥
आर्बस्थान अफगाणिस्थान अशा दूरच्या हि देशांत ॥
जाऊन मराठ्यांनीं अपुला झेंडा हि रोविला त्यांत ॥ २९ ॥
मुख पश्चिमेस करुनी गुडघे टेकून खालिंवर शीर ॥
करुनी " अला अला इल्लिला " अशि निमाज पढणार ॥ ३० ॥
त्या यवनांच्या कर्णीं त्यांच्या देशींच ह्या मराठ्यांचा ॥
गर्जूनि हर हर महादेव असा घोष जाय विजयाचा ॥ ३१ ॥
ध्यानिमनीं स्वप्नीं ही त्या यवनांच्या कधीं न आलेले ॥
अमुचे तरवारबहादूर मराठे यशास चढलेले ॥ ३२ ॥
त्यांच्या डोकीवरलीं मुंडासीं आणि तीक्ष्ण तलवारी ॥
कंबरेस लटकलेल्या चित्रें हीं पडलिं दृष्टिला सारीं ॥ ३३ ॥
या परि देशानें ह्या करुनि पराक्रम निवारिले जाच ॥
सामर्थ्य हें कशाचें ? केवळ एका स्वतंत्रतेचें च ॥ ३४ ॥
सारांश काय सद्गुण काय कला धर्म शौर्य कांहिं ह्मणा ॥
ज्याला ज्याला सुख हें आहे नामाभिधान मुख्य गणा ॥ ३५ ॥
त्या सर्वांची प्राप्ती होते एका स्वतंत्रते करुन ॥
पास्तव त्या देवीला नित्य भजावें मनांत ठसवून ॥ ३६ ॥

अवलोकिता असे हे स्वतंत्रताजनित सर्व लाभ महा ॥
करिल हिचें साम्य असें उपमा द्यायास योग्य काय? अहा! ॥ ३७ ॥
सकल धनसंपदांचें निधान सुंदर कुबेरनगरी जी ॥
ती तर नसेल ना ही भास असा क्षणभरी मना हो जी ॥ ३८ ॥
अथवा गमते स्वाश्रितजनदुःखें सर्व न्यावया भंगा
केवळ माहेरघर च मुक्तीचें श्रेष्ठ तीच ही गंगा ॥ ३९ ॥
अथवा सकल मनोरथ पुरवी संपूर्ण सिद्धिचा ठाय ॥
जी कामधेनु ती हो वाटे प्रत्यक्ष हीच कीं काय ॥ ४० ॥
श्रीपरमेशपदांच्या प्राप्तीचें मुख्य काय साधन तें ॥
निर्मल भक्ति च ऐसें सर्व महा ग्रंथ वर्णिती ज्ञाते ॥ ४१ ॥
ती भक्ति साध्य करुनी घेण्यास्तव ही स्वतंत्रताच हवी ॥
तर मग तें साधन ही हीच असें मानिती न काय कवी ॥ ४२ ॥
सारांश भूतलीं ह्या स्वतंत्रतेच्या समान मित्र नसे ॥
लाभ नसे सौख्य नसे कांहिं च उत्तम हिच्या समान नसे ॥ ४३ ॥
ह्या कोणत्याहि ऐहिक सौख्याच्यानें हिची न करवेल ॥
तुलना कल्पलतेची करिल कशी फलद ही इतर वेल ॥ ४४ ॥
ओंवाळुन टाकावीं एका हीच्या वरुन तीं सारीं ॥
सौख्यें कारण त्यांना कैसाची ही हिच्या नयेचि सरी ॥ ४५ ॥
यास्तव ऐशी जी ही स्वतंत्रता कामधेनुसम माता ॥
प्रेमें प्रतिपाळावी करुनि वसिष्ठा परी सदा ममता ॥ ४६ ॥
जैसा चंदन झिजतो परमेश्वरकारणीं तसेंचि सदा ॥
आपण देहिं झिजावें नित्य हिच्या कारणीं त्यजूनि मदा ॥ ४७ ॥
रक्षावें प्राणाहुनि अधिक हिला प्रेमबंध लावूनी ॥
होईल तेथवेरीं सोडुं नये कधिंहि आपुल्या कडुनी ॥ ४८ ॥
इतकें करुन ही जर विश्वामित्रा समान लोभिजन ॥

ार करुनी अपुले सारे उपाय खुंटवून ॥ ४९ ॥
नऊ च लागले हो अन्यायानें बुचाडुनी हिजला ॥
तर मग उपाय नाहीं आपुलिया हातचा असा उरला ॥ ५० ॥
परि त्या ऐशा दुर्घट समयीं ही ही वसिष्ठ ऋषिच्या च ॥
त्या कामधेनुपरि बहु करिल पराक्रम महा महा साच ॥ ५१ ॥
ही बहु कृतज्ञ आहे आपण संरक्षणार्थ हा वेळ ॥
झटलो हिच्या ह्मणुन ही संकटसमयास शीघ्र पावेल ॥ ५२ ॥
प्रतिपाळ आपुला ही करील राहून आपणा जवळ ॥
ह्मणुनी स्वतंत्रता ही मम "मुख्योपास्यदेवता" प्रबळ ॥ ५३ ॥
ाते, स्वतंत्रते हे, तव महिमा मी किती तरी वानूं ॥
ैम्यखोद्भवकारण असशी तूं सृष्टिला जसा भानू ॥ ५४ ॥
"झालों मी बंधमुक्त आज" असें ॥
काय असे ॥ ५५ ॥
आणि असा स्वप्न प्रिय तरी पहायास कैक वेळां तो ॥
दिनरात्र ईश्वराची दीनत्वें प्रार्थना किती करितो ॥ ५६ ॥
तूं धन्य! कविजनांच्या हृदया आल्हाद तूंच गे देशी ॥
तूंच हि तन् गानांच्या अक्षयसा विषय एक गे होशी ॥ ५७ ॥
सुकवित्वप्रेरणा तरि त्यांच्या हृदयांत तूंच गे करिशी ॥
तेही निष्कपटत्वें करिती सेवन तुझें निशीं दिवशीं ॥ ५८ ॥
तैशीच सुबुद्धी ही अत्युत्तम देणगी महा प्रचुर ॥
त्यांच्या हातीं लागे तुझ्याच योगें करून गे अचर ॥ ५९ ॥
पालणपोषण करुनी त्यांची अद्भुत सुकल्पनाशक्ती ॥
भरधांव चालण्याची दाखविशी तूंच गे तिला युक्ती ॥ ६० ॥
कवितेच्या आंगीं जी नांदे अनिवार शक्ति अति रम्य ॥
वसती तसेच जे गुण सरस मनोहर तिच्यांत अनुपम्य ॥ ६१ ॥

तें सर्व एक जर तूं नसशिल तर गे पहा क्षणार्धात ॥
नाहींसें होईलचि संशय नाहींच कांहिं गे यांत ॥ ६२ ॥

भरतो जो वीररसप्रधान काव्यांत रंग गे इतका ॥
साधे तसाच जो रस मधुर मनोहर तयांत गे इतका ॥ ६३ ॥

आणि मनाला होतो इतका आनंद जो तयां वरुनी ॥
तो सर्व एक सुंदर माते आहेस तूंच गे ह्मणुनी ॥ ६४ ॥

सारांश हे शरण्ये माते मज्जीव तूं चि मत्प्राण ॥
तूंचि विसावा माझा माझें सर्वस्व तूंचि गे जाण ॥ ६५ ॥

माते लळा तुझा तरि इतका मज लागला ग आहे कीं ॥
अन्य न मान्य तुझ्याविण कांहिंच वाटे न गोड गे लोकीं ॥ ६६ ॥

मजला जरी स्मशानीं कोठें ही टाकिलें तरी कांहीं ॥
चिंता नाहिं परंतू संनिध तूं एक मात्र गे राहीं ॥ ६७ ॥

ओंजारुन गोंजारुन आंगावर लोळण्या तुझे आई ॥
लडिवाळपणें मजला सांपडल्यावर नको दुजें कांहीं ॥ ६८ ॥

वर्षानुवर्ष मी गे अन्न न पाणी न कांहिं मागेन ॥
ह्मणतील ज्या तऱ्हेनें वागावें गे तसाच वागेन ॥ ६९ ॥

अत्यंत थंडि जेथें मनुष्य अगदीं थिजून मरणार ॥
धाडाल त्या हिमालयशिखरीं तरि मी न नाहि ह्मणणार ॥ ७० ॥

जेथें प्रखर रवीच्या तापें भाजून माणसें पडती ॥
अगदीं कालीं ठिकर तेथें ठेवा मला न नावड ती ॥ ७१ ॥

एका पायावर मी तयार अगदीं कशा हि त्या बिकट ॥
जागीं रहावयाला आहे पण त्यांत एक मात्र अट ॥ ७२ ॥

होऊं नये चुकामुक कधीं हि माझी व आइची माझ्या ॥
अगदीं जवळ असावी ती बाहुलिच्या समान डोळ्यांच्या ॥ ७३ ॥

आश्रय पदांबुजांचा करुन तिच्या भ्रमरसा सदोदीत ॥
प्रेमें निमग्न होउन बसेन अपुला खुशाल गाईत ॥ ७४ ॥

---

माझा प्रिय आवडता विद्यार्थी राजमान्य बुद्धिबळें ॥
बी. ए. तिलकालंकृत सद्गुणमणिहार कृष्णराव मुळे ॥ ७५ ॥
सत्काव्यवृद्धि व्हावी यावी ऊर्जितकला स्वभाषेला ॥
लोभावीं लोकमनें देशोन्नत्युत्कटाभिलाषेला ॥ ७६ ॥
यद्धृदयीं मज विषयीं अति निर्मळ पूज्यभाव वागतसे ॥
तद्दर्शनार्थ हे त्या लघुकृति अत्यादरें समर्पितसें ॥ ७७ ॥

---

जून सन १८७९ इसवी.

# राज्यह्मणजेकाय ?

श्लोक

नर श्रेष्ठ हो राज्य तें काय ऐका ॥
नव्हे राज्य तें ज्यांत उद्दंड पैका ॥
नव्हे चांदिसोनें अलंकार नाना ॥
हिरे पाच रत्नें जवाहीर खाना ॥ १ ॥

नव्हे कोट वेशी गढ्या दुर्ग किल्ले ॥
प्रयासें महा भव्यसे बांधिलेले ॥
नव्हे फौज कंपू शिबंदी रिसाले ॥
हत्यारें बहु खड्ग बंदूक भाले ॥ २ ॥

नव्हे बंदरें सिंधुतीरा वरील ॥
जिथे माल व्यापारधंदा विपूल ॥
जिथे तारवें राक्षसी आरमार ॥
दिमाखें तुफानांस ही हांसणार ॥ ३ ॥

नव्हे वस्ति विस्तीर्ण जेथें विशाल ॥
घरें मंदिरें राजवाडे महाल ॥
बहू शोभती रम्य नाना प्रकारीं ॥
जणों वैभवें शुद्ध ते इंद्रपूरी ॥ ४ ॥

नव्हे दिव्य शृंगारिलेली कचेरी ॥
छतें झालरी स्वच्छ हंड्या त्रिलोरी ॥
जिथें रेशमी गालिच्या लोढ गादी ॥
मऊ बैठका तख्त सिंव्हासनादी ॥ ५ ॥

जिथें साधनी दास झेलूं हुकार ॥
उभे आदरें बोलती चोपदार ॥

शिरीं छत्र तीं चामरें दोन्हि बाहीं॥
बडेजाविचा थाट तो सर्व कांहीं ॥ ६ ॥

जिथें अर्जवी कृत्रिमी अल्पदृष्टी ॥
करां जोडुनी वर्षती स्तोत्रवृष्टी ॥
बकध्यानि मायावि गप्पाष्टकांती ॥
मदांधापुढें मोहनीधूप देती ७ ॥

नव्हे हो नव्हे राज्य हीं दुर्भविष्यें ॥
मनुष्यें खरें राज्य जाणा मनुष्यें ॥
मनुष्यें कशीं ? प्राज्ञ मोठ्या मनाचीं
महोदारधी सद्गुणी प्रौढ साची ॥ ८ ॥

पशू मंदबुद्धींत बुद्धिप्रभावीं ॥
अतिश्रेष्ठशक्तुच्चकोटी असावीं ॥
जशीं काष्ठपाषाणसृष्टीजडांत ॥
जड श्वापदें श्रेष्ठ सज्ञान होत ॥ ॥ ९ ॥

कळे पूर्ण कर्तव्यता त्यांस त्यांची ॥
तशी सेव्य आज्ञा प्रमाण प्रभूची ॥
परी जाणुनी हक्क वा स्वत्वपूर्ती
तिच्या रक्षणीं दक्ष ते धैर्यमूर्ती ॥ १० ॥

---

एप्रिल सन १८८४ इसवी.

# मातृपकारस्तोत्र

## श्लोक

सुखप्रद जगत्रयीं शिशुस मुख्य मातापिता ॥
झटे बहु तयांत ही जननि धन्य सांगोपितां ॥
महा तदुपकार ते जगिं न साम्य त्यां मापितां ॥
तयां प्रणति तत्कथा सुरस रम्य आलापितां ॥ १ ॥

सलोभ मृदुलोदरीं अचलभारवत् वाहुनी ॥
सुजन्म मजला दिला श्रम परोपरी साहुनी ॥
किती प्रसवकष्ट ते!! प्रसवतीच त्या जाणती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते, किती ॥ २ ॥

कळे न मज कांहिं ही पशुच बाळ मी नेणतें ॥
जिवा पलिकडे तदा जपुन रक्षिलें जाणते ॥
मुखीं पय पुनःपुन्हा पिलिशि आदरें तूंच ती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते, किती ॥ ३ ॥

स्तनीं प्रथम लाविलें शिकविलें मला प्यावया ॥
मुखीं भरवुनी पुढे समयिं अन्न ही खावया ॥
क्षुधा न मज ती तुला बहुत होय गे व्यापिती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते, किती ॥ ४ ॥

कृपाळु किती लाड तो भरवितां दिसे युक्तिचा ॥
पुरे ह्मणुन बोलतां ह्मणशि घांस घे काउचा ॥
तुझीच ममता करी मजशि थोर सानाप्रती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते, किती ॥ ५ ॥

लहान परिचीतशीं वदुन बोबडीं भाषणें ॥
बये पढविलें कसें हळुहळू मला बोलणें ॥

करीं धरुन पावलें तशिंच टाकवीलींस तीं ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते, किती ॥ ६ ॥

कथूं कितितरी असें, पढविलेंस सर्वोपरी ॥
अपार ममता दया तुझि नयेच कोणा सरी ॥
गुरुंत गुरु मुख्य तूं विबुध शास्त्रि ही बोलती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते, किती ॥ ७ ॥

खुशाल मलमूत्र म्यां करुनियां कितीदां बरें ॥
स्वतां भरुन ही तुला भरविलीं तुझीं अंबरें ॥
परी कधिं न माझि त्वां चिळस केलि; केली स्फिती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते, किती ॥ ८ ॥

हंसून मृदु लाडकें वदशि बोल गे कौतुकें ॥
कशीं बघाशि हर्षुनी अविट घेशि गालीं मुके ॥
तुला प्रिय हि बोबडे गमति बोल माझे अती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते, किती ॥ ९ ॥

परोपरि यथार्थशीं चिमणि साजिरीं गोजिरीं ॥
करुन शिशुभूषणें विविध रम्य वस्त्रें बरीं ॥
संतोषमन हौशिनें मजशि होशि लेवीवती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते, किती ॥ १० ॥

प्रसन्नमन कौतुकें भुजशिरीं करीं कंबरीं ॥
सदैव मज घेउनी फिरविलेंस दारीं घरीं ॥
सुखार्थ मम त्वां बहु झिजविलें स्वदेहाप्रती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते, किती ॥ ११ ॥

उमोप मज खाउ त्वां रुचिरसा कितीदां बरें ॥
दिलास पयशर्करा मधुर खारका खोबरें ॥
पदोपदिं सदा असे पुरविलेस हेतू किती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते, किती ॥ १२ ॥

जिरो पचुन भक्ष्य ही श्रम हरोत निद्रासुखें ॥
ह्मणून मज पाळणीं निजवुनी हरीखें मुखें ॥
गितें मधुर मंजुळें झुलवितां किती गावि तीं ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते किती ॥ १३ ॥
भला कळवळा लळा! जरि धरी चळा आगळा ॥
गळां धरुन त्वां खळा मजशि दुर्बळा ओंगळा ॥
छळा न गणितां खुळा वदुन खेळवीलें असी ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते किती ॥ १४ ॥
जिवास गमलें कुठें जर जरा न माझे बरें ॥
तुझें त्दृदय कोंवळें त्वरित होय तें घाबरें ॥
दया विमल पाझरे जाशि सुधानदीधार तीं ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते किती ॥ १५ ॥
इजेंत न निजें खिजें कधिकधीं अहोरात्र मी ॥
उपाय किति काय ते करिशि थोर होशी श्रमी ॥
सुखासुख रसेपरी सकल होशि तूं साहिती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते किती ॥ १६ ॥
चिडें बहु अडें रडें घडिघडि दिसें बापुडें ॥
तदा धरिशि पोटिशीं मज तुला रुचे आवडे ॥
मुखास कुरवाळिशी वदाशि "गा उगा" सूक्ति ती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते किती ॥ १७ ॥
कठीण दुखणें पिडा बहु करी शरीरीं मला ॥
करीस उपचार ते बहुत कोण आस्था तुला ॥
नसे त्वदिय ओषधीनवसमंत्रतंत्रा मिती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते किती ॥ १८ ॥
पिडा न मजला करो गद ह्मणून पथ्यें स्वतां ॥
करुन बहु भोगिले सदय कष्ट खातांपितां ॥

बघून मजला सुखी तव त्वदीं सुखें दाटती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते किती ॥ १९ ॥
क्षणोक्षण विलक्षण प्रबळ घेतली आळ जी ॥
सदा पुरविलीस ती तव मनीं किती काळजी ॥
प्रयत्न करितीस ही प्रिय अदेय देण्याप्रती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते किती ॥ २० ॥
जरीं हि धरिं हट्ट मी करिं बहूत खोड्या तरी ॥
क्षमा करिशि तूं बरी कधिं हितार्थ शिक्षा खरी ॥
भविष्यशिवकारि ती किति सुयुक्त शिक्षारिती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते किती ॥ २१ ॥
दिसेंदिस दिसे जशी मम कला तुला वाढती ॥
त्वदीय सुखसिंधुला भरभरे किती वाढ ती ॥
सुखें सकल ही तुला मजहुनी उणीं वाटती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते किती ॥ २२ ॥
असे सदुपकार ते लघुमती किती आठऊं ॥
अशक्य फिटण्यास तें ऋण किती गणीं गांठऊं ॥
न दे नफिटलां धनी ऋण तशी न तूं वोपिती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते किती ॥ २३ ॥
अऱ्हेरिति सुजन्मदे किति कृतघ्न तीं बालकें!!! ॥
कृतज्ञमति द्यावि त्यां मज सदा जगत्पालकें ॥
त्वदीय भजनीं जडो अचल निश्चयें मन्मती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते किती ॥ २४ ॥
कृपा करुन ईश्वरें सुखहयाति द्यावी मला ॥
स्वधर्म मनिं हाच कीं सतत साह्य द्यावें तुला ॥
झिजून तव कारणीं मम तनू घडो सद्गती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते किती ॥ २५ ॥

पुन्हा हि ऋण जन्म दे त्वदुदरीं तरीं देउं दे ॥
बरा ऋणद एक तो वहुहुनी जनीं, जन्मदे, ॥
तुझ्या सम न कोणि ही मज ऋणी कुळा रक्षिती ॥
अवर्ण्य अविमोच्य ते त्वदुपकार माते किती ॥ २६ ॥

---

चित्तीं लोभ अपार मोह ममता माया जिच्या सर्वदा ॥
सोशी पालनपोषणीं झटुन जी सप्रेम कष्टापदा ॥
खाणी पूर्ण चि जी सुखोपकृतिचीं कीं कामदोग्धीश्वरी ॥
प्राणाहून अधीक मानुनि मला अत्यंत जोपा करी ॥ २७ ॥

वात्सल्यबुद्ध्या वपु कष्टवीलें ॥
मातें रजाचा गज वाढवीलें ॥
माता विटेना जरि हो कुपुत्र ॥
गावें किती मातृपकारस्तोत्र ॥ २८ ॥

**आर्या**

ऐसें अवर्णनीय प्रेमळ अनुपम्य सर्व सौख्य-वितें ॥
सद्गुणविशालवैभवधन्यत्वाचा प्रकार दाखवितें ॥ २९ ॥
अत्यंत स्तोत्र थिटें हें अति सप्रेमभावविनयकलें ॥
श्री चिर सौभाग्यवती माय उमेच्या पदाब्जि अर्पियलें ॥ ३० ॥

---

मार्च सन १८७५ इसवी.

# मातृमोह

### दिंड्या

प्रहर लोटोनी वेळ दहावीची ॥
प्रभा पडलीसे शुभ्र चंद्रिकेची ॥
पवन शीतळसा झुळूझुळू वाहे ॥
त्यांत पुष्पांचा गंध मिश्र आहे ॥ १ ॥

नभीं तारापति शोभतो सभोंती ॥
दिव्य नक्षत्रें अमित चमकताती ॥
फुलें जडलीं जणूं गगनचांदव्याला ॥
नव्हे; रत्नांचा पेर हाचि झाला ॥ २ ॥

नगरमार्गाच्या बाजु वरुन दोनीं ॥
गोळीनें उजळती दुकानीं ॥
जणों धवानी आरती करांत ॥
उभी रजनी विधु पाहुनी नभांत ॥ ३ ॥

सर्व दिनभर हो खपुनियां अनेक ॥
कामकाजें उरकून सकल लोक ॥
घरीं येउन विश्रांत मनीं होती ॥
खानपानादिक कोणी आटपीती ॥ ४ ॥

कोणि खुर्चीवर बसुन आपसांत ॥
गोष्टि आनंदें सुरस बोलतात ॥
कोणि समया सारून दीपजोती ॥
मनोरंजक हो ग्रंथ वाचिताती ॥ ५ ॥

कोणि गंजीफाबुद्धिबलादीक ॥
खेळ खेळोनी करिति कर्मणूक ॥
कोणि निजले हो मृदुल बिछान्यांत ॥
पडुन विश्रांती गाढ झोंप घेत ॥ ६ ॥

वाग लोकांची कमी होत आहे ॥
पथीं निश्चलता होउं जरा पाहे ॥
अशा समयीं अवचीत ऐकुं आली ॥
दीर्घ किंकाळी दुरुन त्दयपोळी ॥ ७ ॥

बाइ झाला हो घात महा झाला ॥
बाळ माझा सोडून मला गेला ॥
कुठे आतां मी पाहुं तुला लाला ॥
काय तान्हूल्या स्वर्गवास केला ॥ ८ ॥

बहुत तळमळ केलीस बिछान्यांत ॥
मधां माझापरि दुःखवेदनांत ॥
तुला नाहीं तें दुःख सहन झालें ॥
ह्मणुन परलोकीं काय गमन केलें ॥ ९ ॥

काल कांहिंसे चैन तुला बाळा ॥
पडुनि आरामा परी त्वां अझांला ॥
भासवूनी वा आज कां निवांत ॥
कशी विझली अवचीत दीपजोत ॥ १० ॥

बहुत काकुळती करुन दीनवाणी ॥
काल मागितलें कैक वेळ पाणी ॥
पापिणीनें म्या उद्या तुला बाळा ॥
देउं केलें, तें तोडतें जिवाला ॥ ११ ॥

मला नव्हतें हें विदित तुवां, बाळा, ॥
पाणि शेवटचें इच्छिलें कपाळा!! ॥
जरी मजला हें पुढिल कळुन येतें ॥
पाजिलें मी जल पोट भरुन तूतें ॥ १२ ॥

वैद्यबावा जरि असे मला काल ॥
स्पष्ट कळवीते न करितेंच हाल ॥

अतां कां रे तें मागशी न बाळा ॥
"पाणि पाणी" हो करित जीव गेला ॥ १३ ॥
नेत्र फिरवीले गरगरां कसे ते ॥
प्राण जातांना पसरुनी च मोठे ॥
सर्व राहिल हें स्मरण जन्मभेर ॥
ऱ्हदीं माझ्या जणुं बोंचती कटार ॥ १४ ॥
देवि रांडा ह्या कशा पोटजाळ्या ॥
तुला आल्या या घेउनीच गेल्या ॥
काय सटव्यांना नव्हति दुजी जागा ॥
ह्मणुन आल्या या बघित हीच जागा ॥ १५ ॥
काळ मेला तो पुरुष दया आला ॥
नाहिं काडीची प्राण हरायाला ॥
स्त्रिया होउन ही तुह्मी असें केलें ॥
कसें एकुलतें एक बाळ नेलें ॥ १६ ॥
बाळ नेवोनी दीन मला केलें ॥
तया वरचें हो कां न मला नेलें ॥
देवि कश्या ह्या नष्ट दैव खोटें ॥
छळित आहे हो हात धुवुन मातें ॥ १७ ॥
काय दैवा अन्याय तुझा झाला ॥
ह्मणुन अवचित हा घात असा केला ॥
होति दुष्टा तव सहज खेळ रे हे ॥
परी दुःखामी ऱ्हदय जाळितो हें ॥ १८ ॥
जिणें लोकीं ह्या व्यर्थ विना बाळें ॥
कसे नशिबा विपरीत तुझे ताळे ॥
काय माया हे तुझी देवराया ॥
देशी सौख्या रडविशी धांयधायां ॥ १९ ॥

तुळशि आई तुज कोप कसा आला ॥
कसा दुःखाचा शैल कोसळीला ॥
रमाकांता कां कोप मनीं केला ॥
कुठे माझा तान्हुला बाळ नेला ॥ २० ॥
असें करणें हो तुह्मा जरी होतें ॥
कष्टवीलें कां प्रसवि उगा मातें ॥
काय केलें म्यां पूर्वि पाप थोर ॥
ह्मणुन पाखडली आग अशी घोर ॥ २१ ॥
कूपिं कोणा सोडून खालिं दोर ॥
वरुन कापीला बनुन म्यां कठोर ॥
दिलें नकळे म्यां दुःख कीं मृगीला ॥
तिच्या आवडत्या हरुनि पाडसाला ॥ २२ ॥
गोर गरिबांचा करुनि मनीं हेवा ॥
हरण केला कीं काय द्रव्यठेवा? ॥
माय धरणी तूं देई मला ठाव ॥
कसे सोसूं हे तीव्र दुःखघाव ॥ २३ ॥
धांव घेई हो दुडूदुडू जेव्हां ॥
पदीं घागुरिया खुळूखुळू तेव्हां ॥
वाजती त्या प्रभु स्तब्ध पडुन आज ॥
कसें केलें त्वां विउन मला वांझ ॥ २४ ॥
काय निर्जीव हि असुन तयां झालें ॥
गडी नेल्याचें दुःख मनीं काळें ॥
काय बाळा तूं आज शब्द एक ॥
नाहिं बोलत! कां केली डोळझांक ॥ २५ ॥
"आइ आइ" वा ह्मणत दहावेळा ॥
पुढें माझ्या लडिवाळपणें बाळा ॥

कसें यावें त्वां पुनःपुन्हा लाला ॥
हात पसरोनी खाउ मागण्याला ॥ २६ ॥

अतां पाटावर बसुन पुढे माझ्या ॥
घांस घेइल ते कोण मुखीं राज्या ॥
गडू देऊं कोणास तो भरोनी ॥
कुणा बोलावूं " जेउं ये " ह्मणोनी ॥ २७ ॥

" आज नाहीं बोवाजि तुह्मां संगें ॥
उद्यां येइन मी नका भरूं रागें " ॥
काल झोंपीं बरळून शब्द ऐसे ॥
आज केले त्वां तेच खरे कैसे ॥ २८ ॥

अरे परवां " रंगीत हत्ति काळा ॥
दे ग आई तो मला खेळण्याला " ॥
फार केला ॥
तसा नव्हता त्वां आधि कधि केला ॥ २९ ॥

ह्मणुन तुजला मी मारियलें बाळा ॥
काय त्याचा बा राग तुला आला ॥
विदित नव्हतें हें पुढिल मला झालें ॥
जळो माझे ते हात कां वहाले ॥ ३० ॥

इथे बाळा तुज दुःख फार झालें ॥
ह्मणुन परलोकीं गमन तुवां केलें ॥
काय माझा रे वीट तुला आला ॥
नाहिं विश्रांती तिळ हि ह्या जिवाला ॥ ३१ ॥

अतां तुजविण हे दिवस युगें माला ॥
कसे कंठूं ते इथे अरे बाळा ! ॥
तुझ्या वांचुन मज सुचत नसे अन्य ॥
सर्व वाटे गृह चोंहिकडे शून्य ॥ ३२ ॥

प्रेमभावानें आपुल्या गड्यांना ॥
दाविशी तूं खेळणीं नित्य नाना ॥
डागडागीने परोपरी बाळा ॥
टोपि अंगा तव जरीकांठि शेला ॥ ३३ ॥

सर्व चिन्हें हीं त्हृदयपोळणारीं ॥
दिसति डोळ्यांच्या पुढें मोहकारी ॥
सर्व आवडत्या वस्तु तुझ्या बा ह्या ॥
कसा गेलाशी येथ टाकुनीयां ॥ ३४ ॥

पुरे आतां हा शोक पुरे, बाई, ॥
मनीं समजा तें जरा धरा कांहीं ॥
फळे झाडांतें येति बहू त्यांतें ॥
तितुकिं टिकतीं तर काय हवें होतें ॥ ३५ ॥

सकल गोष्टी ह्या करीं देवजीच्या ॥
गती चालति ना येथ मानवांच्या ॥
गेलि वस्तू ती गेलि, अतां बाई, ॥
शोक केल्यानें परत येत नाहीं ॥ ३६ ॥

अशा रीतीनें परोपरी तीतें ॥
असे समजावित कोणि दुजें तेथें ॥
येइ हुंदका तों अधिक हृदिं न माय ॥
दीर्घ हंबरडा फोडि जशी गाय ॥ ॥३७ ॥

नको मजला हा जीव नको कांहीं ॥
विना बाळाच्या गमत मला नाहीं ॥
पाय पडले हे गार जसें काल ॥
फिकट दिसती हो ओंठ तसे गाल ॥ ३८ ॥

हात लावीते हळुच मुखा त्याच्या ॥
अश्रु नेत्रांनीं वाहती तियेच्या ॥

हांक मारीले त्यास थोरल्यानें ॥
फुंदफुंदोनी दीर्घ विलापानें ॥ ३९ ॥
काय बाळा "ओ" आज देत नाहीं ॥
अतां कोणा मी "बाळ" ह्मणूं बाई ॥
नाहिं आशा ना उरलि अतां कांहीं ॥
अरे जगदीशा मृत्यु मला देई ॥ ४० ॥
असें आत्यंतिक दुःख तिला झालें ॥
घोर मूर्छेनें सहज घेरियेलें ॥
तिची आई तों बहुत घाबरोनी ॥
धरी पोटाशीं तीस सांवरोनी ॥ ४१ ॥
बये माझे गे काय मांडिलें हें— ॥
परी उमटेना शब्द पुढें मोहें ॥
सोड आई मज सोड; "अरे बाळा" ॥
असें बोलोनी झोडि करें भाळा ॥ ४२ ॥
धरा त्यांस धरा धरा आंवरोनी ॥
कोणि ह्मातारी ह्मणे गहिंवरोनी ॥
नका हंबरडे फोडुं नका ऐसे ॥
हाय जगदीशा काय करूं कैसें ॥ ४३ ॥
सर्व तुह्मी आक्रांत असा केल्या ॥
कशा येतिल त्या वृत्ति तिच्या गेल्या ॥
कोणि इतक्या मधिं पुरुष पुढें होती ॥
अश्रु त्यांच्या हीं नयनिं वाहताती ॥ ४४ ॥
वृद्धपणिं ह्या आधार तुझें नांव ॥
अह्मां तरण्याला जीवनांत नाव ॥
आयुदोरी तव तुटुन भवाब्धींत ॥
दुःखभरतीनें आह्मि डूबतोंत ॥ ४५ ॥

उगा; हां हां हां शांति धरा शांती ॥
मना आवरुनी धीर धरा चित्तीं ॥
नाहिं; नाहीं हो, आज अह्मां आतां ॥
बाळ अमुचा विश्रांति सौख्य दाता ॥ ४६ ॥

नका दुखवूं त्या नका असें ओढूं ॥
नका डागीनें कांहिं नका काढूं ॥
जळो सगळें तें पाहिजे कशाला ॥
पुढें आतां तें घालु मी कुणाला ॥ ४७ ॥

जरा स्वस्थ असा स्वस्थ; नका फोडूं ॥
अशा किंकाळ्या धीर नका सोडूं ॥
अशा शब्दांनी धैर्य कोणि देती ॥
अंगवस्त्रें निज नेत्र ते पुशीती ॥ ४८ ॥

फुंद फुंदोनी टाकिती उसासे ॥
स्तब्ध बसले किति भानरहित ऐसे ॥
वस्त्र झांकोनी उचलिती शवाला ॥
सर्व ओरडती एकदांच "बाळा"— ॥ ४९ ॥

बाळ गेला हो आज बाळ गेला ॥
प्रभो कैसा हा समय दाखवीला ॥
अशा आरोळ्या ठोकिती विशाला ॥
रडारोई कल्होळ एक झाला ॥ ५० ॥

करीं आक्रोशा माय "अरे बाळा" ॥
शब्द उमटेना कंठ बसुन गेला ॥
केश ओढीते झोडिते कपाळा ॥
ऊर बडवीते लोळते भुईला ॥ ५१ ॥

अह्मां टाकुन रे जाशि कसा बाळा ॥
नका माझ्या हो नेउं सोनटयाला ॥

हाय! शिव शिव शिव! व्यर्थ! उमाकांता, ॥
तुझें चिमण्या मुख पाहुं कुठे आतां ॥ ५२ ॥
तोंच इतक्यामधिं बैसविलें अंकीं ॥
तिच्या बहिणीनें आपुल्या मुला कीं ॥
मूल भांबावुन चुकुरपणें पाहे ॥
ह्मणे तिजला हळु "मावशि मी आहें" ॥ ५३ ॥

## आर्या

राजश्रियाविराजित बहुगुणमंडित महोद्यमी चतुर ॥
मांत्रिकबुद्धिविशारद गुणश्लीकर सुंशदीतिकर ॥ ५४ ॥

शास्त्री गणेश सीताराम शुभें नाम लोकविख्यात ॥
ज्यां विषयीं माझें मन तल्लिन अति पूज्यबुद्धिसख्यांत ॥ ५५ ॥

तत्प्रीतिदर्शनास्तव त्यांना हे "मातृमोह" लघु करणी ॥
अर्पण करितों भावें अत्युत्साहें विनम्रतादरणीं ॥ ५६ ॥

मार्च सन १८७२ इसवी.

# आळस.

## अभंग

जाणा आळस शरीरीं ॥ हालाहल अभ्यंतरीं ॥ १ ॥
तो चि दुष्टाईची आई ॥ सर्व दुष्कर्मांची दाई ॥ २ ॥
महा पापां पैकीं एक ॥ असे घोर तो पातक ॥ ३ ॥
तो चि मुख्य पिशाचाचें ॥ शय्यास्थान विश्रांतीचें ॥ ४ ॥
नर मंद श्वाना परी ॥ आधिव्याधी नित्य वरी ॥ ५ ॥
मनालस्य तो दारुण ॥ असे देहालस्याहून ॥ ६ ॥
जें कां उद्योगा वांचून ॥ चातुर्य तें पीडा जाण ॥ ७ ॥
मनीं आळसाचा जंग ॥ मूर्तिमंत नर्करोग ॥ ८ ॥
अप्रवाही डबक्यांत ॥ किडे आळ्या वाढतात ॥ ९ ॥
तैसे आळशाच्या चित्तीं ॥ दुष्ट विचार माजती ॥ १० ॥
बुद्धि अर्थात बिघडे ॥ तेणें सर्व नाश घडे ॥ ११ ॥
ह्मणोनियां नको बा रे ॥ घेऊं आळसाचें वारें ॥ १२ ॥
ज्या वर आळसाची स्वारी ॥ त्याशि सौख्य ना संसारीं ॥ १३ ॥
त्याशि संपत्ति आव्हेरी ॥ थोर मानपद दूरीं ॥ १४ ॥
त्यासि दैव पाठमोरें ॥ कष्टदुःख ये सामोरें ॥ १५ ॥
त्यासि असोत विपुल ॥ सर्व गोष्टी अनुकूल ॥ १६ ॥
मिळो हर्ष समाधान ॥ जें जें वांच्छि त्याचें मन ॥ १७ ॥
त्यांत नसे त्यास खुशी ॥ जों जों होय तो आळशी ॥ १८ ॥
त्यास देहीं ध्यानीं मनीं ॥ नसे कधीं समाधानी ॥ १९ ॥
सदैव तो त्रासलासे ॥ आधिव्याधी लावी पिसें ॥ २० ॥
सदा चिरड पावतो ॥ आणि सुस्त मंदावतो ॥ २१ ॥
वागे आशंकीत मनीं ॥ कण्हे कुंथे रडे जनीं ॥ २२ ॥
कोपें त्रासे जगताशीं ॥ तैसा प्रत्येक गोष्टीशीं ॥ २३ ॥
किंवा इच्छी आत्मघात ॥ मूर्ख आळशाचें चित्त ॥ २४ ॥

जुलै सन १८७६ इसवी.

# दरिद्र

## आर्या

दारिद्र्य हें महा गद दुःखद छळकर पिशाच्च संसारीं ॥
मनुष्यास आणितें अति अघटित कुलें करून अविचारी ॥ १ ॥
केवळ हें प्रतिपक्षी संपत्तीचें कृतघ्न दायाद ॥
सापत्नवैर साधी लज्जास्पद वहन निंद्य अपवाद ॥ २ ॥

## श्लोक

खाण्या अन्न नसे पिण्या धड नसे पात्र स्वसता नसे ॥
आंगीं वस्त्र नसे सुधें गृह नसे शारीरलज्जा नसे ॥
विद्ये मान नसे गुणा बुज नसे चातुर्यशोभा नसे ॥
लोकीं तेज नसे सभागम नसे सत्कारकीर्ती नसे ॥ ३ ॥
स्नेही आप्त नसे रती वश नसे उद्योगसिद्धी नसे ॥
शक्तित्राण नसे जरा वग नसे थारा विचारा नसे ॥
बंधुप्रेम नसे प्रिया खुश नसे आधीन कोणी नसे ॥
दुःखा पार नसे सुखा स्थल नसे निश्चिति चित्तीं नसे ॥ ४ ॥

असे सर्व रीत्या महा क्लेश फार ॥
तरी यांत भासे नफा एक थोर ॥
नसे चोरभीती दरिद्री जनाला ॥
असौख्यांत हें सौख्य कांहीं मनाला ॥ ५ ॥

## आर्या

पडतां दारिद्र्यांजन संपद्योन्मत्तधुंद नेत्रांत ॥
तत्काल खोड मोडे गुमि जिरे अष्टयाणीं मंत्रांत ॥ ६ ॥
नकळे काय किती कधिं केले उपकार म्या तुझ्यावती ॥
ह्मणुन दरिद्रा ठेविशि इतकें मित्रत्व तूं हि मजवरती ॥ ७ ॥

# गणिकाविराम.

श्लोक

साष्टांगवंदन असो जगदीश्वरातें ॥
जो विघ्नराज सुकवी अघसागरातें ॥
देवो सुकाव्यमति तो मज लेंकरातें ॥
श्लोकांत बोध करितों गणिकावरांतें ॥ १ ॥

कामीकुरंगनर ही गणिकागरांत ॥
जाती सुखार्थ फसती जणुं वागुरांत ॥
घेतात नाश करुनीं अवघ्या धनांचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ २ ॥

वेश्या-चरित्र अति-दुर्गम तें कळाया ॥
कापट्यजाल अति दुस्तर तें पळाया ॥
घे प्राण जेवि बडिशामिष हो मिनांचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ ३ ॥

जातांच हास्यवदनें अमृता समान ॥
बोलून मिष्टवचनें अति देति मान ॥
लोभें उपाय करिती मनवेधनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ ४ ॥

नानापरी रिझविती भजती सुखानें ॥
स्नेहें "सख्या, जिवलगा" वदती मुखानें ॥
मोहीं सुगंध कटु तो जणु चंदनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ ५ ॥

सन्मूख साखर बहू पसरोनि, जाळीं ॥
गोंवून पाठ वळतांच शिव्या कुचाळी ॥
भावार्थ सर्व गजदंतिच भाषणांचा ॥

जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ ६ ॥

मोहून चित्त अवघे निजछंदकामी ॥
मोंदून वित्त हरिती त्यजिती निकामी ॥
क्षीणे प्रकार मग तो मनमोहनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ ७ ॥

होतो फलद्रुप तरूवर तों रहाती ॥
त्याच्या वर द्विजकुलें प्रितिनें पहा तीं ॥
हो सार्थ पांखरुपणा उपलक्षणाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ ८ ॥

सौंदर्य-सद्गुण-कला-कुल-शीलवंत ॥
हो वा न हो नर गणी नयनीतिवंत ॥
त्यां तोच मान्य हृदयीं निधि जो धनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ ९ ॥

जारा नरा गमतसे गणिका सुरामा ॥
प्रेमें चि ते वरिति दुर्गतिची सुरा मा ॥
कां नाश ना करिल सेवन तें मनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ १० ॥

कामी रमे मधुप पद्मिनिकामुकेशीं ॥
जातां हिरण्यकर मोक्ष च जीविकेशीं ॥
होतो चि शेवट असा मधुसेवनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ ११ ॥

सर्वां सवें करिति संगें विकून काय ॥
मेहादि रोगपुतळ्या बनती सकाय ॥
प्रत्यक्ष ह्या ज्वलनिं होम च कीं तनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ १२ ॥

यक्ष्मा प्रमेह उपदंश भगेंद्र ऐसे ॥
नाना कुरोग तनुला विषसर्प जैसे ॥
देतात ताप निधनप्रद वेदनांचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ १३ ॥

रोगांस ह्या वरुन आपण जार अंगीं ॥
स्वस्त्रीस ही बुडविती निजसंगसंगीं ॥
होतो असा तनुविनाश वरांगनांचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ १४ ॥

संयोगजन्य गद घातुक यातनांहीं ॥
होतो विनाश तनुचा इतुकेंच नाहीं ॥
प्रायः नकार मग संततिवर्धनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ १५ ॥

दैवानुसार विरळा जरि संतती हो ॥
अल्पायु रोगि मतिमंद कुरूप ती हो ॥
सारांश मोड च जळे कुलवर्धनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ १६ ॥

सर्वांशि संगकृति हे पशुच्या समान ॥
वेश्यांत नित्य असतां विट त्यांस मान ॥
देतो कुधी मनुज तो पशु कीं मनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ १७ ॥

ज्यां लागली रुचि अती गणिकारतींची ॥
ते होति त्या विषयरानिं शिकार तींची ॥
भिल्लीस पाड कितिसा मृगनाशनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ १८ ॥

तारुण्यवित्तमदधुंदिभरांत नाना ॥
क्रीडा अनंत गणिकांशि करा तनाना ॥

जातांच हें समय ये मग रोदनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ १९ ॥

फांके घरांत पडती न मिळे हि भाजी ॥
छीथू जनांत करती नच हांजिहांजी ॥
तों खट्ट धूर उतरे मग लोचनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ २० ॥

स्नेही अनेक असती गणिकेस त्यांत ॥
ये वांकडें विषयलुब्धपणीं नशांत ॥
दैवानुसार घडतो हि गुन्हा खुनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ २१ ॥

वेश्या प्रसन्न करण्यास्तव दक्षणांत ॥
होईल ही धनदकोश रिता क्षणांत ॥
अर्थांत अर्थ सरतां दिन ये ऋणाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ २२ ॥

देऊनि ही धन असें बहु त्यां कुकर्मी ॥
येतां दरिद्र त्यजिती वदती हि मर्मीं ॥
दुर्बुद्धि घे मग कुमार्ग धनार्जनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ २३ ॥

चोरी असत्यवचनादिक दुर्गुणांहीं ॥
लोकांस नागवुनि नागवि आपणा ही ॥
हे दुष्ट खेळ करि मोह कुवासनांचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ २४ ॥

कृत्यें अचाट करितां बहु दुष्ट ऐशीं ॥
खोडा बिडी अटक दंड उदंड फांशी ॥
यांशी प्रसंग पडतो मग यातनांचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ २५ ॥

देवी गणून गणिका विट भक्त होतीं ॥
स्वस्त्री तयां गमलसे अति नीच होती ॥
संसार ठीकच बुडे सुकुलांगनांचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ २६ ॥

रूपादि सर्वगुणमंडित ही स्वकांता ॥
वाटे न रम्य गणिकेहुनि जारकांता ॥
प्रेमा अफूंत न गुळीं व्यसनी मनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ २७ ॥

वेश्या कशी हि असली तरि तीं विटांना ॥
वाटे अति प्रिय जसा मळ पू किटांना ॥
निभ्रांत सोमल विनाशक जीवनाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ २८ ॥

वेश्येस शालु लुगडीं नग मोति रत्नें ॥
स्वस्त्रीस बांड सुंकलें हि अति प्रयत्नें ॥
हा काय शेवट असा करधारणाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ २९ ॥

विप्राग्निदेवगुरुसाक्ष विवाहकाळीं ॥
देऊन भाकवचनें वधुतें सुकाळीं ॥
कापट्यभाव करणें तिशिं दूषणाचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ ३० ॥

तारुण्य वित्त विट वेंचुनि ह्या कुकर्मीं ॥
होतां जरी अधन लागति देवधर्मीं ॥
राहे न मार्ग पण तो अघमोचनांचा ॥
जाणा चि संग विषवत् गणिकाजनांचा ॥ ३१ ॥

सर्वो परी अहित ह्या गणिका-विरामीं ॥
त्यागा मुळीं विषय हा चि महा हरामी ॥

प्रेमें करा स्तव अगाध जनार्दनाचा ॥
प्या गोड तो बुध सुधारस लेखनाचा ॥ ३१ ॥

---

## आर्या

जे फाटककुलदीपक बळवंततनूज रावजी नाम ॥
नीतिनिपुण कार्यकुशल माझे प्रिय मित्रवर्य सुधाम ॥ ३२ ॥
यांस नजर करितों हे लघु कृति गणिकाविरामनावानें ॥
सन्मैत्रिदर्शनास्तव अत्यादरविमलमित्रभावानें ॥ ३४ ॥

---

नोव्हेंबर सन १८७३ इसवी.

# विद्यावैभव
## अथवा
## सटवाईचें गाणें.

### साक्या

प्रथमारंभीं जगदीशाच्या नमितों पदकमलातें ॥
कृपा जयाची सुबुद्धि देउन झाडी जाड्यमलातें ॥ १ ॥
वारुन शरणागतापदा जो प्रेमें दे अवनातें ॥
कृपा करुन तो सुमति नता मज देवो या कवनातें ॥ २ ॥
कलहपराभवकल्होळाचा दिवस संपला सारा ॥
जिकडिल तिकडे कामें काजें उरकुन सर्व पसारा ॥ ३ ॥
त्रासपरिश्रममत्सरगलबा याहीं अगदीं श्रांत ॥
झाल्यानें मज झोंप लागली रात्रीं गाढ निवांत ॥ ४ ॥
स्वप्न विलक्षण पडलें मजला; ज्यांत एक पाहिली ॥
बहु दिवसांच्या पूर्वि पाहिल्या वाड्यांतिल हो खोली ॥ ५ ॥
सुंदर पडदे त्या खोलीच्या प्रकाशदा बाजूस ॥
लावियलेले असती ऐसा झाला मजला भास ॥ ६ ॥
तथापि त्यांतुन विधुचे शीतल किरण आंत येऊन ॥
पडली होती अल्प चंद्रिका कांति धवल फांकून ॥ ७ ॥
जोत दिव्याची आली होती विझण्याच्या बेतांत ॥
प्रभा तिची ती मिळून गेली धूसर विधुप्रभेंत ॥ ८ ॥
आणि पुरातन मंदिरांत त्या अगदीं सर्व निवांत ॥
झालें होतें सामसूम तरि मध्यें मध्यें त्यांत ॥ ९ ॥
रात्रीं शीतळ मंद झुळूझुळु येणाऱ्या पवनाच्या ॥
संगें श्रवणीं मात्र काय तो येई ध्वनि दूरींच्या ॥ १० ॥

धबधब धबधब थोर नदीच्या पाण्याच्या स्रोताचा ॥
तसाच टिकटिक अवाज हळुहळु वाड्यांतिल घटिकेचा ॥ ११ ॥
खोलिमधें त्या एक बाजूला भिंती पाशीं खाट ॥
असे मांडिली जी विणलेली सुंभानें घनदाट ॥ १२ ॥
बाजे खालीं मृन्मय सगळ्या अग्नीनें भरलेल्या ॥
बाळंतिणिला शेकायास्तव असती ठेवियलेल्या ॥ १३ ॥
अधि तयांतिल गेला होता बहुधा विझून सारा ॥
तरी क्वचितशा फुणग्या राखीं लिकलिकती जणु तारा ॥ १४ ॥
भक्कम सुंदर त्या बाजेवर ऊर्णादिक वस्त्रांची ॥
शय्या जी वर गाढ झोंप घे बाळंतिण भाग्याची ॥ १५ ॥
प्रसूतिका ती गोज़िरवाणी होती दिसत नवीना ॥
श्रांता विगलितगात्रा म्लाना भूषाकलाविहीना ॥ १६ ॥
मांथां टोपी पायीं मोजे घालुन कटी कसून ॥
पांघरलीसे ती पासोडी जाडी आंगभरून ॥ १७ ॥
तैलहरिद्रा सर्वांगाला मर्दुन लावियलेली ॥
असे जिणे मृदुकाया पिवळी विलसे बहु थकलेली ॥ १८ ॥
जातिपुष्पसम कोमल तनु ती केतकिच्यावर्णाची ॥
फिकट विराजे केवळ जणुं का अभ्रांतिल चंद्राची ॥ १९ ॥
निज शोभेनें लाजविणारें फुललेल्या कमळांला ॥
तें मुख उतरुन गेलें आहे जणुं मोंती डाळाला ॥ २० ॥
मृदुल टवटवित गाल गुलाबी ते असती बसलेले ॥
विशाल काळे चपल मीन ते डोळे खोल रिघाले ॥ २१ ॥
नेत्रीं पातीं मिटुन परस्पर पक्ष्मराजि ते राजे ॥
विघटित शामल छटा काजली ज्यांत रम्य अति साजे ॥ २२ ॥
विशाल शशिरुचि भाळावरती वक्र सुरकुत्या त्यांत ॥

सूक्ष्म घर्मकणबिंदु चमकती जमून खालें वहात ॥ २३ ॥
कुंकू शिढळीं थोर पसरलें टोपीच्या योगानें ॥
जींतुन कुरळे केंस विसंगत दिसती क्वचित कडेनें ॥ २४ ॥
विद्रुमकांती मृदुल वाळले ओंठ जांभळे झाले ॥
तांबुलरंगीं मिश्रण होउन दांतवणाचें काळे ॥ २५ ॥
भूषणविरहित कंठ उका तो घर्मयुक्त बहु झाला ॥
श्वासोच्छ्वासें क्लेशनदीला वाटे पूरचि आला ॥ २६ ॥
सुंदर गोंडस गजशुंडा जणुं कोमल कमलमृणालें ॥
ते गोरे भुज चलना वलना विरहित शयनिं निमाले ॥ २७ ॥
स्थूल पयोभर कुंभ रसाचे साध्या काळ्या चोळीं ॥
पदरा खालीं विराजती जो उडे हळू वर खालीं ॥ २८ ॥
खोलीच्या त्या दुसऱ्या बाजुस कलशादिक पुजिलेले ॥
असती त्यांच्या समीप दुसरे पदार्थ ठेवियलेले ॥ २९ ॥
दौत लेखणी चाकूकातर सुरी ढाल तरवार ॥
नारळ नाडापुडि कटिसूत्रादिक सुत्रालंकार ॥ ३० ॥
बाजे पाशीं खालिं भुईवर सुपांत बाळवस्यांत ॥
ह्या जगतांतिल नव निद्रेचा अनुभव घेत निवांत ॥ ३१ ॥
निजलें होतें बाळ तान्हुलें एक फार सकुमार ॥
सुंदर जणुंका वाटे मजला दुजा जन्मला मार ॥ ३२ ॥
आणि पुढें मग काय पहा हो आलें कीं दिसण्यांत ॥
नूतन तान्ह्या त्या बाळाच्या होतें जें नशिबांत ॥ ३३ ॥
त्याचा पाढा वाचूं देवी सटवायादिक आल्या ॥
ज्यांच्या हातीं सर्व आपुल्या असती जीवितकिल्या ॥ ३४ ॥
अतां कशा त्या आल्या गेल्या आणि काय येऊन ॥
केलें त्यानीं तें कथितों हो ऐका मन देऊन ॥ ३५ ॥

कोठें त्यांच्या चरणांचा ध्वनि किंचित झाला नाहीं ॥
तसाच त्यांचा पदन्यास ही क्षितितलिं वठला नाहीं ॥ ३६ ॥
भयाण अंधारांतुन झाल्या प्रकट आणि परतून ॥
अंधारांतच गुप्त होउनी गेल्या त्या मिसळून ॥ ३७ ॥
प्रथम योगिनी संपत्तीची स्वामिण दिमाखदार ॥
हिनें आपुला वक्रनेत्र ही करून त्या सकुमार ॥ ३८ ॥
मुला कडे हो ढुंकुन सुद्धा न पाहतां लवलाहीं ॥
निघून गेली त्याजपासुनी दावुन बेपरवाई ॥ ३९ ॥
दुसरी डामाडौलाची ती स्वामिण नखरेदार ॥
क्रोध हेळणा कंस्याळ्यांत चि पहिलीहूनी फार ॥ ४० ॥
तिटकाऱ्यानें नाकच मुरडित गेली त्या पासून ॥
नंतर सत्तास्वामिण गर्वे आली तिज मागून ॥ ४१ ॥
स्वमस्तकींचा किरीट मणिमय किंचित वर बाजूला ॥
सारुन भाळीं आंठ्या चढवुन पाहुन गेली त्याला ॥ ४२ ॥
ऐषारामाची हो स्वामिण स्वकरांतिल गजऱ्याच्या ॥
सुगंध सुमनांतील शुष्क दल सुद्धां त्या बाळाच्या ॥ ४३ ॥
शय्येवरती न फेंकितांही गेली तशिच निघून ॥
अशा प्रकारें एकी मागें एक अशा येऊन ॥ ४४ ॥
गेल्या साऱ्या परंतु कोणी ही नाहीं त्यांतून ॥
आशिरवादियलें त्या तान्ह्या मुलाकडे पाहून ॥ ४५ ॥
ऐशा ह्या उन्मत्त योगिनी गेल्या त्वरित निघून ॥
नंतर आली महान देवी सर्वांच्या मागून ॥ ४६ ॥
सर्व शक्त हे, सर्वोत्तम हे, सत्यप्रिय हे, आई, ॥
वैभवसंपन्ने हे देवी, ती तूं कोण ग बाई! ॥ ४७ ॥
ज्या तव लोचनकिरणांचा बहु समूह चमकत होता ॥

तसाच माथां अमरवल्लिचा मुकुट विराजित होता ॥ ४८ ॥

आणिक जी तूं सुपा जवळ त्या बसून सारी रात ॥
आल्हादाचें अजब तऱ्हेनें गाणें होतिस गात ॥ ४९ ॥

गाणें गाइत होतिस हें तूं कीं " माझ्या माऊल्या ॥
" लक्ष्मीसत्तादिक देणाऱ्या सर्व योगिनी गेल्या " ॥ ५० ॥

" तर त्या जाऊंदेत सर्व त्यां मेल्यांचा अधिकार " ॥
" असौख्यकारक अधोभूमि अणि कालक्षणभंगूर " ॥ ५१ ॥

" यां वर असतो मात्र काय तो ह्मणुन लाडक्या त्यांस ॥
" जाऊंदे बा स्वस्थ ऐस तूं न टाकितां निश्वास " ॥ ५२ ॥

" विचारमानसभूतभविष्यत्सृष्टी वर अधिकार " ॥
" पूर्ण चालतो माझा ह्मणुनी ठेवीं तूं निर्धार " ॥ ५३ ॥

" नशीब जें कीं महा प्रतापी ह्यांना ही जमिनींत " ॥
" लोळवितें बा खेळ करोनी आणी हें ध्यानांत " ॥ ५४ ॥

" वृधावस्था जी करवीते पश्चात्ताप चि साचा " ॥
" तारुण्यांतिल भोगियलेल्या सर्व हि उपभोगांचा " ॥ ५५ ॥

" नशीब तें ती वृद्धावस्था स्पर्शूं ही सकणार " ॥
" नाहीं ज्यांना असे देणगी बा माझी भरपूर " ॥ ५६ ॥

" अशा कोणत्या प्रबल देणग्या त्या हें जर ह्मणशील " ॥
" ज्ञानपिपासा रसज्ञता ह्या ज्या तुजला वरतील " ॥ ५७ ॥

" अन्य योगिनी ज्या मम भागिनी त्यांच्या कबजांतून " ॥
" अतांच जन्मा पासुन तुजला देतें मुक्त करून " ॥ ५८ ॥

" तुजहुन बहु मानाची जागा मिळेल जरि कोणास " ॥
" तरि तव सौख्या सम मज पाशीं अन्य न त्यां देण्यास " ॥ ५९ ॥

" ऐसे ही किति असती जे कीं सांधारण लोकांस ॥
" माझ्या अतिशय ममतेंतीलाचि असति असा हो भास " ॥ ६० ॥

" आणि तयांना धनदौलत वा सत्ता आदिकरून " ॥
" चंगळ सारी, बाळा, वाटे मिळते मज पासून " ॥ ६१ ॥

" परंतु त्यांतिल एकादीची दासी ऐसें मातें " ॥
" समजुनियां तलाभा पुरतें केवळ रंजविती ते " ॥ ६२ ॥

" ऐशांना जरि किती हि पुस्तकि विद्या झाली प्राप्त " ॥
" अथवा त्यांची कीर्ति दगंतीं झाली सर्वव्याप्त " ॥ ६३ ॥

" तरि त्यांना मम अंतरिंच्या अति गहन गहन ज्या किल्या " ॥
" कधींच समजायाच्या नाहिंत माझ्या प्रिय तान्हुल्या " ॥ ६४ ॥

" कीर्ति अकीर्ति यश अपयश वा ऐशा परिच्या नाना " ॥
" सुखासुखस्थिति पैकीं कोण्या स्थितींत ही असतांना " ॥ ६५ ॥

" माझ्या वरची नाहिं कधींना प्रीति तुझी उडणार " ॥
" असे भरवसा कीं तूं मजवर करिशिल ममता फार " ॥ ६६ ॥

" माझ्या वर तूं मना पासुनी प्रीत ठेविशिल बा, रे, ॥
" मी ही तुजवर शतगुण उलटी ठेविन त्याच प्रकारें " ॥ ६७ ॥

" प्रियकर ममतेचे ही अतिशय लोक रुष्ट होतील " ॥
" तशा प्रसंगीं ही तुजवर मम पूर्णदृष्टि राहील " ॥ ६८ ॥

" जरि तुजला अति विश्वासाचा जन कोणी फसवील " ॥
" तरी भरवसा माझा तुजवर अढळ चि तो राहील " ॥ ६९ ॥

" कारण पाहा ध्वजा कडे मम त्या वर ज्या फांदीचें " ॥
" सुचिन्ह केलें असे तिचें काधिं झाड न वाळायाचें " ॥ ७० ॥

" अन्य सर्व ज्या पादपवल्ली प्रफुल्ल बहु होतात " ॥
" मात्र एक देदीप्यमान जो वसंत ऋतु वो त्यांत " ॥ ७१ ॥

" सर्व हि त्या गतपत्र होउनी जाती तें च न बा हा " ॥
" मध्वज असतो सदासर्वदा नव प्रफुल्लित पाहा " ॥ ७२ ॥

"बेकनास मम सरोष सरदारांच्या समोर जेव्हां" ॥
"उभें राहणें भाग जाहलें तान्हुल्या ग्या तेव्हां" ॥ ७३ ॥
"लज्जेच्या त्या कलंक समयीं साह्य त्यास होऊन" ॥
"पाठ राखिली त्याची बा रे धैर्य थोर देऊन" ॥ ७४ ॥
"माझा हार्वे पडला होता परदेशीं दुखण्यांत" ॥
"महिनोंमहिने बहुत तळमळ करीत आंथुरणांत" ॥ ७५ ॥
"तेव्हां त्याला त्याची शय्या सुखदायक होण्याला" ॥
"प्रेमानें मी सर्वोपरिची तरतुद केली बाळा" ॥ ७६ ॥
"माझा न्यालीं होता केवळ एकटाच पडलेला" ॥
"तुरंगांत रे, बाळा, तेव्हां सोबतीस मी त्याला" ॥ ७७ ॥
"प्राचिनकालिन महा धुरंधर धीर वीर पुरुषांना" ॥
"आणुन त्याच्या जवळ ठेविलें अहोरात्र ही त्यांना" ॥ ७८ ॥
"तसाच माझा प्रिकर मिलटन अंध बिचारा झाला" ॥
"तेव्हां स्वर्गी प्रभुच्या चरणा पाशीं वसती बाळा" ॥ ७९ ॥
"देवदूत ते त्याजजवळ मी आणोनीया त्याला" ॥
"प्रकाशमयसा करुन सोडिलें माहित हें जगताला" ॥ ८० ॥
"कालिदास मम जेव्हां त्याच्या प्रिय दयिते पासून" ॥
"सत्ताधाऱ्यां कडून कोपें तुटातूट होऊन" ॥ ८१ ॥
"दूर विदेशीं वास कराया पाठविला बा गेला" ॥
"तेव्हां तेथें पहा कशी मी झाल्यें सहाय त्याला" ॥ ८२ ॥
"गरिब बिचारा प्रेमसागरीं अगदीं बुडून गेला" ॥
"तसाच विरहें वेडा होउन केवळ भ्रमिष्ट झाला" ॥ ८३ ॥
"पाहुनियां रमणीय टवटवी कोमल वनवल्लींची" ॥
"होउं लागली स्मृति प्रियेच्या त्यास रम्य कांतीची" ॥ ८४ ॥
"विशाल चंचल काळे डोळे पाहुनि मृगबाळांचे" ॥

" होउं लागलें स्मरण तयाला रमणीच्या डोळ्यांचें " ॥ ८५ ॥
" परिसुन कोकिलशब्द मधुर अति मंजुल सुस्वर कार्नी " ॥
" होउं लागली स्मृति कांतेच्या बोलांची तद्ध्यानीं " ॥ ८६ ॥
" अशा प्रकारें पदार्थ मात्रीं दिसूं लागली त्याला " ॥
" त्याची प्रियकर सुंदर ललना क्षणोक्षणीं वेल्हाळा " ॥ ८७॥
" ऐशा दुर्घट त्या समयीं मी त्याचें दौत्य करून ॥
" रंजन केलें निरोप त्याचा प्रिये कडे नेऊन " ॥ ८८ ॥
" माझ्या नागोजीभट्टाला नवती संतति कांहीं " ॥
" ह्मणून त्याची पत्नी अतिशय खंती करीत राही " ॥ ८९ ॥
" सदासर्वदा ह्मणत असे ती अपुल्या प्रिय कांताला " ॥
" दुर्दैवानें नाहीं जळ्ळी संपत्ती अपुल्याला " ॥ ९० ॥
" तर ती मेली नसो परंतू कृपा करुन भगवंतें " ॥
" असतें मूल दिलें एखादें तर बहु उत्तम होतें " ॥ ९१ ॥
" असे प्रियेचे बोल ऐकुनी वारंवार तयाला " ॥
" विस्मय होई तेव्हां त्याचें करुनि शांतवन बाळा " ॥ ९२ ॥
" लोक मान्य दीर्घायू आणिक सर्व भरतखंडांत " ॥
" प्रसिद्ध ऐशीं दोन अपत्यें त्यास दिलीं आहेत " ॥ ९३ ॥
" अमर रहावें नांव आपुलें सर्व भरतखंडांत " ॥
" यास्तव अद्भुत शोधा करितां दुर्गम परदेशांत " ॥ ९४ ॥
" तानभूक अति सोसुनि कष्टें प्रवास दुर्घट केला " ॥
" त्यांत भास्कराचार्याला त्या मीं च दिलें सौख्याला " ॥ ९५ ॥
" मम भर्तृहरी नृप राज्यादिक अनुपम विषयसुखांला " ॥
" आनंदें उपभोगित असतां एके दिवशीं बाळा " ॥ ९६ ॥
" गृहांत अति विश्वासस्थानीं विपरित काळेंबेरें " ॥
" जें निज वदना कुलाशिलाप्रति कलंक लाविणारें " ॥ ९७ ॥

" अवलोकुनियां खिन्न होउनी सकलहि त्या सौख्यांला " ॥
" धिक्‌धिक् ह्मणुनी एकाएकीं वैरागी तो झाला ॥ ९८ ॥
" तेव्हां त्यासह रानोरानीं फिरोनियां मीं त्याला " ॥
" सदुपदेशपर शतोपाय ते करुन दिले साह्याला " ॥ ९९ ॥
" ऐशा कोट्यावधि भक्तांना विविध रीतिनें हात " ॥
" देउनियां मीं सहाय केलें ठेवीं हें ध्यानांत " ॥ १०० ॥
" संसारांतिल उत्सव आणिक निःकाळजी स्थितींत " ॥
" विद्याभ्यासानंद महोत्सव यांच्या उपभोगांत " ॥ १०१ ॥
" निमग्न असतां माझ्या बाळा नाहीं रहावयाचें " ॥
" भान तुला दिन केव्हां कैसा येतो जातो याचें " ॥ १०२ ॥
" अशा सुखाच्या समयीं मात्रचि म्या तुज जवळ असावें " ॥
" इतकिच माझी इच्छा नाहीं बाळा हें समजावें " ॥ १०३ ॥
" तसें च जेव्हां लक्षावधिजनसमूह थोर जमून " ॥
" करितिल जयजयकार महा तव विजयी रथ वेढून " ॥ १०४ ॥
" अथवा अति दैदीप्यमानशा सुरेख रंगमहालीं " ॥
" सुरूप सुंदर नारींनीं तव गुणानुवाद सुकालीं " ॥ १०५ ॥
" गाइयलेले मधुरमधुरतर मंजुल सुस्वर कानीं " ॥
" परिसुनि ये तव ह्रदयसमुद्रा भरती उचंबळोनी " ॥ १०६ ॥
" ऐशा हर्षद समयीं मात्र चि असेन तुजपाशीं मी " ॥
" असें नव्हे तर दुःखाच्या ही समया येइन कामीं " ॥ १०७ ॥
" देह विनाशी अणि थकलेला आत्मा हीं झुरणीस " ॥
" लागति अथवा उदास दुःखद मरणप्राय जिवास " ॥ १०८ ॥
" घोर अशा बहु दिवसयामिनी लागति लोटायास " ॥
" तेव्हां मी तुज संनिध राहिन तत्पर तव साह्यास " ॥ १०९ ॥
" तसेंच दुणखें, संकट, निंदा युद्ध भीति दुःखांत " ॥

" बाळा आहे तुझी च मी बा प्रवास दारिद्र्यांत " ॥ ११० ॥
" मोठ्या मोठ्या अद्रितुल्य बहु लाटा धडाडतात " ॥
" आणि हिमद्विज किंकाळ्या बहु फोडुनि ओरडतात " ॥ १११ ॥
" ऐशा अंटार्टिक जलधीच्या जवळिल हिमप्रदेश " ॥
" विकट अतीशय जेथें राहे धुंद सदा आकाश " ॥ ११२ ॥
" ज्यांत हिमालयशिखरा वरच्या थंडीहुनिहि विशेष " ॥
" खरतर थंडी पडुनी बाळा दारुण देते क्लेश " ॥ ११३ ॥
" ऐन उन्हाळीं रणरणतें अति ऐशा वैशाखांत " ॥
" धुकें छावतें ढगा वरी ढग येउनि निबिड नभांत " ॥ ११४ ॥
" त्यांतुनि रविच्या किरणाचा तो प्रकाश यत्किंचीत " ॥
" लिकलिक सुद्धा होय न तेथें तुझीच मी निश्चीत ॥ ११५ ॥
तसेंच जेव्हां सभोंवतीं तत्र डोलीच्या मार्गांत " ॥
विल दिनभर वात " ॥ ११६ ॥
" आणि तयांतुनि तीक्ष्ण उन्हाच्या तापी बहु पडतील " ॥
" तेणें व्याकुल होउनि घडिघडि बाळा घाबरशील " ॥ ११७ ॥
" आणि भयंकर ओंगळ दूषित घातुक हवे मधून " ॥
" किर्र झाडि घनदाट वाढल्या घोर अरण्यांतून " ॥ ११८ ॥
" रात्रीं हिंस्र पशूंच्या स्थाना जवळोनी लागेल " ॥
" जायाला बा तेव्हां ही मी तुझीच हें समजेल " ॥ ११९ ॥
" जेव्हां बाळा मित्र तुझे अति जिवलग घाबरतील " ॥
" आणि कुधी विश्वासघातकी कपटी तुज छळितील " ॥ १२० ॥
" तसेंच जेव्हां महत्संकटीं असतां ही तूं त्यांस " ॥
" आणि दुष्ट भट्टाला तैसें वाचाळसमाजांस " ॥ १२१ ॥
" सत्य दया स्वातंत्र्य शांति ह्या करितां महान धीरें " ॥
" तुच्छ मानिसिल तेव्हां ही मी बाळा असें तुझी रे " ॥ १२२ ॥



" तुझ्या सभोंतीं चालू होइल जेव्हां सर्व प्रकारें " ॥
" क्रुरत्व आणि नीचत्व आणि दुष्टत्व तान्हुल्या रे " ॥ २३ ॥
" आणि रिपूंचा विनोद आणि द्वेष्ट्यांच्या आरोळ्या " ॥
" आणि वल्गना अद्वातद्वा मूर्खांनीं केलेल्या " ॥ १२४ ॥
" या सर्वांच्या कचाटींत तूं अगदीं सांपडशील " ॥
" तेव्हां स्मर मज ह्मणजे त्यांचें सहज हांस्य येईल " ॥ १२५ ॥
" आणिक दौलत गेली पोकळ थाटमाट ही गेले " ॥
" हांजी हांजी करणारे जन खुशामतीहि पळाले " ॥ १२६ ॥
" तरि त्यांची तुज अगदीं क्षिति ही वाटायाची नाहीं " ॥
" कारण माझ्या पुढें तयांचें तेज नसे वा कांहीं ", ॥ १२७ ॥
" पहा सकल ही जाणार चि हें आश्चर्य न मानावें " ॥
" यांचें गमनागमन सिंधुच्या लहरांसम समजावें " ॥ १२८ ॥
" ह्मणून तान्ह्या त्यांस जाउंदे मात्र सदा आनंदें " ॥
" माझे ठायीं आणि सद्गुणा प्रेम पूर्ण राहूंदे " ॥ १२९ ॥

---

सद्गुणरत्नाकर विद्वद्वर राजनीतिनिष्णात ॥
रसवित्तम कवि बुद्धिविशारद राजमान्य विख्यात ॥ १३० ॥
सकल होळकर सरकारांतिल शाळांचे अध्यक्ष ॥
योग्य विनायक रावकीर्तने वरदहस्त गुरु दक्ष ॥ १३१ ॥
वाढो विद्याकला स्वदेशीं ग्रंथ प्रसवो भाषा ॥
सदा स्वदेशोन्नति राहो हे अत्युत्कट अभिलाषा ॥ १३२ ॥
इत्यादिक गुण भूषणदायक असती ज्यांचे फार ॥
तसेंच ज्यांचे सेव्यकृपेचे मजवर बहु उपकार ॥ १३३ ॥
यांच्या स्मरणास्तव यांना हे " विद्यावैभव " नावें ॥
लघु कृति अर्पण करितों सेवक अत्यादरनतभावें ॥ १३४ ॥

---

नोव्हेंबर सन १८६८ इसवी.

# विद्याभ्यासोपदेश.

## आर्या

स ज्जनसमाज पाहुन येथें हा आज हर्ष बहु गमतो ॥
र जनीवरोदयीं जणुं रत्नाकरलहरिसंघ भरभरतो ॥ १ ॥
टी का बहूत नलगे विद्येची महति काय सांगावी ॥
मा ता सर्व सुखांची कल्पलताकीर्ति ती किती गावी ॥ २ ॥
ध न्य तुकोजी राजे! विद्यादानार्थ घातलें सत्र ॥
व र्णन ह्या पुण्याचें लिहितां नपुरेल ही धरापत्र ॥ ३ ॥
रा ज्य स्थिति चालविली सर्वोत्तम कारभारि नीतीनें ॥
व रदीराज्यसुवृद्धी हो श्रीशा मागतों विनंतीनें ॥ ४ ॥

## पद ५

(राग जिल्हा)

विद्याभ्यास करा ॥ मुलांनों, विद्याभ्यास करा ॥ ध्रु० ॥
विद्या नसतां पशुहुन ही अति ॥ मानिति नीच नरा ॥ मु० ॥ १ ॥
सर्व सुखांचें आगर विद्या ॥ हें चि मनीं दृढ धरा ॥ मु० ॥ २ ॥
सर्व भूषणीं विद्याभूषण ॥ भूषवि योग्य नरा ॥ मु० ॥ ३ ॥
पूर्ण व्हावया सकल मनोरथ ॥ विद्या योग बरा ॥ मु० ॥ ४ ॥
विद्यानौका संपादुनिया ॥ हा तमसिंधु तरा ॥ मु० ॥ ५ ॥

## पद ६

(राग जिल्हा)

विद्याधन मिळवा ॥ मुलांनों, विद्याधन मिळवा ॥ ध्रु० ॥
सर्व धनांहुनि हें धन उत्तम ॥ मानसिं दृढ ठसवा ॥ मु० ॥ १ ॥
शकति न तस्कर भाउबंदरिपु ॥ ह्यांतुन हार्ह रवा ॥ मु० ॥ २ ॥
इतर धनें कमि होति व्ययें हें ॥ वाढे उलट सवा ॥ मु० ॥ ३ ॥

अन्य धनासम ह्याचा कांहिं ॥ भार न धाक जिवा ॥ मु० ॥ ४ ॥
बाल्यापासुन उद्योगीं ह्या ॥ झटुन तनू झिजवा ॥ मु० ॥ ५ ॥
होउनि विद्याधनवंत जगीं ॥ थोर पदीं मिरवा ॥ मु० ॥ ६ ॥

पद ७

( राग जिल्हा झिंजोटी )

बनवा विद्योद्यान गड्यांनो, सुंदर घ्या हा बोध मनीं ॥
बनवा वि० ॥ ध्रु० ॥
ह्या कामीं अति प्रविण अनुभवी सेवुन सद्गुरुचरणवरां ॥
प्रथमारंभीं ह्या उद्याना तयार मानसभूमि करा ॥ बं० ॥ १ ॥
दृढतरनिश्चयहस्तें निर्मळ विचारकोयतिनें तोडा ॥
घोरकुसंगाळसजंगल तें उद्यमनागर मग जोडा ॥ ब० ॥ २ ॥
दुर्गुणपाषाणादिक निवडुनि वृद्धसुसंगतिखात शिरा ॥
घालुन चातुर्याभिरुचीच्या खोऱ्यानें ती साफ करा ॥ ब० ॥ ३ ॥
नंतर सद्गुरुबोधविचारें विद्याकल्पद्रुमवल्ली ॥
लावुनि शिंपा ग्यासंगोदक त्यांस नित्य ही गुरुकिल्ली ॥ ब० ॥ ४ ॥
ह्मणजे सुंदर त्यांस सद्गुणांकुर बहु येउन जोरानें ॥
सारासारविचारसुपुष्पें फुलतिल बहुविध रंगानें ॥ ब० ॥ ५ ॥
सुमनांचि ह्या कीर्तिसुगंधी दाबुन षड्रिपुदुर्गंधीं ॥
घुमेल होइल चोंहिकडे सुखशांतिफलाची समृद्धी ॥ ब० ॥ ६ ॥

आर्या

विद्योत्सुक बाळांनो, दुःखदपरिणामि खेळ ते सोडा ॥
ओढा विद्यागाडा तत्परता चिंवट लावुनी नाडा ॥ ८ ॥
चित्त सदा ठेवावें विद्याभ्यासीं तसेंचि गुरुवचनीं ॥
जैसें पूर्ण रमे तें क्रीडारचनीं रुचीर बहु अशनीं ॥ ९ ॥
जातें पुनःपुन्हा गुरें उनाड शेतांत सवकलें खाया ॥
विद्ये कडे तसें मन दवडावें नित्य साध्य ती व्हाया ॥ १० ॥

थोडी थोडी विद्या अभ्यासें नित्य जोडितां बहु हो ॥
कण कण संग्रह करितां बनतो कालांतरें महा निधि हो ॥ ११ ॥
कल्पुन विद्याभास्कर आपण कृतन्या परी निरभिमानें ॥
तत्प्राप्तीस्तव जावें गुरुदात्याच्या गृहास नियमानें ॥ १२

पद १३

( राग जिल्हा झिंजोटी )

गुरुवचना दृढ ध्यानिं धरावें ॥ पिउन गुणामृत स्वहित करावें ॥ ध्रु० ॥
सुबोध अज्ञां अहित भासतो ॥ कषाय कटु परिणामसुखद तो ॥ १ ॥
गुरुवचनाचा विचार करुनी ॥ विचरावें व्यवहारीं सुजनीं ॥ गु० ॥ २ ॥
गुणबोधाविण अन्याचरणीं ॥ लक्ष न द्यावें ही बुधसरणी ॥ गु० ॥ ३ ॥
अनुभव ऐसा पूर्ण घेउनी ॥ पंत तृप्त गुरुपाय वंदुनी ॥ गु० ॥ ४ ॥

---

आर्या

माझा प्रिय आवडता सुत सीताराम सरवटे यास ॥
निश्चल मन अभ्यासीं लाउन त्यानें सुविद्य व्हायास ॥ १४ ॥
वात्सल्यबुद्धिभावें विद्याभ्यासोपदेश ही कविता ॥
हितकर सुबोधवचनी देतों खाऊच गोड हर्षविता ॥ १५ ॥

---

जून सन १८७२ इसवी.

# कार्तिकस्नान.

श्लोक

प्रभातीं हेमंतीं पसरुन धुकें तें चहुंकडे ॥
दिसेना कोणाला दुरुन अपुल्या जें पलिकडे ॥
पथीं पांथां थंडी बहु थडथडावी विकसतां ॥
मुखीं वाफा येती सिस सिस असे शब्द निघतां ॥ १ ॥

पवन शीतल झुळूझुळु वाहतो ॥
सरुलता सुमनपल्लवि खेळतो ॥
खग परोपरि तयां सह डोलती ॥
गळतसे टपटपां दंव खालतीं ॥ २ ॥

विश्रांति घेउन निशीं अवघ्या प्रभातीं ॥
सूर्यप्रभा निरखुनी मनिं खिन्न होती ॥
होईल तापद अतां दिन हा म्हणोनी ॥
झाडें दवाश्रु जणुं गाळिति पल्लवानीं ॥ ३ ॥

दाही दिशा उजळल्या तिमिरा हरोनी ॥
फांके प्रकाश गगनीं क्षितिजावरोनी ॥
मंदत्व ये हळुहळू मग तारकांला ॥
प्राची सुकुंकुम अशा वरिते प्रभेला ॥ ४ ॥

क्रीडा करीत असतां रजनी शशीशीं ॥
येतां मरीचि उदया उदयाचलाशीं ॥
पाहून त्यास मनिं ती बहु खिन्नतेला ॥
पावून लाजुन पळे मग पश्चिमेला ॥ ५ ॥

विलासीं दंपत्यें प्रिय विरह व्हावा न निशिचा ॥
प्रकाशा तत्प्रेमें वदति अरुणाच्याचि शशिचा ॥

तरुस्कंधीं गानें खग मधुर मंजूल करिती ॥
तयांना रात्रीचा स्वन मनसि मानून रमती ॥ ६ ॥
रंगांत भंग करितो युव दंपतीच्या ॥
लाभास दे प्रिय परस्पर चुंबनाच्या ॥
खेदास दे जणु महा रिपु आळशांचा ॥
आल्हाद दे प्रिय सखा जणु उद्यमींचा ॥ ७ ॥
सौख्यदुःखकर हे गुण ज्यांत ॥
कुक्कटस्वन असा नगरांत ॥
होतसे कुठकुठे सदनांत ॥
येतसे दुरुन तो श्रवणांत ॥ ८ ॥
राजमंदिरादिकां वरून ही चहूंकडे ॥
मंगलस्वरांत उंच वाजतात चौघडे ॥
कोणि रागरागिण्यांत आळवी रमापती ॥
पेषणांवरी किती स्त्रिया गितें अलापिती ॥ ९ ॥
पांथस्थ मार्ग क्रमिती उठोनी ॥
विद्यार्थि विद्या पढती अटोनी ॥
योगी समाध्यांत निमग्न होती ॥
देवार्चनाला द्विज बैसताती ॥ १० ॥
भाज्या फळादी छबड्यांत घेउनी ॥
माळी विकाया निघती घरांतुनी ॥
वाणी दुकानें उघडून झाडिती ॥
नानापरींच्या जिनसांस मांडिती ॥ ११ ॥
परोपरि विलायती झुबकदार टोप्या शिरीं ॥
रुमाल दप्ती किती धरुन स्लेटपाट्या करीं ॥
गुणामृत पियावया गुरुसमीप शाळेप्रतीं ॥
मुलें बहुत धाकुटीं लुटुलुटू पदीं चालती ॥ १२ ॥

उष्णाची अति सूक्ष्म बालकिरणें हेमापरी शोभती ॥
अद्रीच्या शिखरावरी चमकती वृक्षांवरी हालती ॥
आकाशीं बघतां तया अवसरीं आरक्त सोन्यापरी ॥
गोळा अर्क निघूं करी हळुहळू दिग्मंडला ऊपरी ॥ १३ ॥

त्या मुंडमाला कर शोभतात ॥
अंगीं हरिद्रा जणुं तेज पीत ॥
अद्रीतुरंगीं वरभानु येत ॥
दिग्सुंदरीला वरण्या नभांत ॥ १४ ॥

दिंड्या

चिर्र चिवचिव चीं पिहू पिहू पीही ॥
शब्द नानापरि उंचनिंच कांहीं ॥
पक्षि वृक्षांवर बसुन बहुत गाती ॥
मधुर मंजुल ते कर्ण कर्षताती ॥ १५ ॥

धरुन पोटाशीं एक पाय कोणी ॥
दुजा लांबविती आंग थरारोनी ॥
लपुन चोंचीनें पक्ष शोधिताती ॥
भक्ष्य धुंडाया कैक उडुन जाती ॥ १६ ॥

मांसगोलक जणुं पक्षरहित कोठीं ॥
पिलें चिवचिव चाऱ्यार्थ तीं करीती ॥
खाउं घालाया त्यांस येतिजाती ॥
कैक त्यांच्यावर बसुन ऊबवीती ॥ १७ ॥

कैक शिकवाया थोरशा पिल्यांना ॥
हळुच उडवीती आतिभौति त्यांना ॥
तींहि बागडती त्यांस मोद होती ॥
पंख उघडुन ते बहु स्पष्टवीती ॥ १८ ॥

चोंच पसरोनी कुदत धांव घेती ॥
माय चोंचीने चोंचिं भक्ष्य देती ॥
कितिक चुकवूनी आपल्या पिलांना ॥
दूर पळती साधून भराऱ्यांना ॥ १९ ॥

श्लोक

अशा प्रेमोल्हासीं विहरति बहू स्वेच्छ खग तों ॥
मधें एकाएकीं अवचित कुठें बार सुटतो ॥
अवाजासरसें त्या भिउन अवघे भर्र उडती ॥
मुखें नानारीत्या विलपतिच कल्लोळ करिती ॥ २० ॥
असे कावरेबावरे फार होती ॥
थरारोनि सारे पिसारे पहाती ॥
विलोला सुदृष्टी गळे लांबवोनी ॥
[illegible] चोंहींकडे धावरोनी ॥ २१ ॥
[illegible] बार ॥
मनीं मानिती हर्षती कैक मोर ॥
पिसारे झुलावीत ते नाचताती ॥
मुखें "म्याउ म्याउ" अशा केकि गाती ॥ २२ ॥

आर्या

इंदुरच्या पूर्वेला याम्योत्तर सोज्वला नदी वाहे ॥
मानवपशुपक्ष्यादिक तज्जल सेवून बोलती, वा! हे ॥ २३ ॥

श्लोक

दूर्वा कोमल घास गार हिरवा दोन्हीं तटीं त्यावरी ॥
हिमाचे कण सूक्ष्म सूक्ष्म पडले ते शुभ्र मोत्यां परी ॥
सूर्याच्या किरणीं चकाकत किती आहेत चोंहीकडे ॥
मध्ये उत्तरवाहिनी नदि फिरे फेरे उजू वांकडे ॥ २४ ॥
वाळूंत कैक बसलीं बदकें निवांत ॥
भक्ष्यार्थ धुंडित किती फिरतीहि तीत ॥

जोडून पाय बक शांत उभे जलांत ॥
लक्षून मीन धरतीच किती मुखांत ॥ २५ ॥

**साक्या**

पिंपळ चिंच वटादिक तीरीं सुंदर लहान थोर ॥
वृक्ष जयांचीं पाने पवनें हालति वारंवार ॥ २६ ॥
सळसळ सळसळ वाजति तीं जणुं ह्मणती आनंदानें ॥
थंडी जाउन होइल आतां सुख भानूत्कर्पानें ॥ २७ ॥
अथवा प्रभुला प्रभातकालीं विनम्र होउन फार ॥
आळविती तीं कृतज्ञभावें आठवुनी उपकार ॥ २८ ॥
अथवा पक्षी जाति चराया सोंपुन निज बाळांतें ॥
"संरक्षूं" त्यां खुशाल ह्मणुनी देती अभिवचनांतें ॥ २९ ॥
अथवा उद्भिजगण निज आश्रित यांतें बहु सुखवाया ॥
होतो मित्रोदय हें पाहुन प्रेमें घेति बलाया ॥ ३० ॥
अथवा सविता प्रकाशदाता उदयाद्रीं पाहोनी ॥
ये ये सत्वर ह्मणुनी ह्मणती पल्लवकरमुद्रांनी ॥ ३१ ॥
अथवा शशि निशि यांचा करितो विरह स्वागमनानें ॥
मित्र ह्मणोनी हंसती त्यातें विनोदमतिभावानें ॥ ३२ ॥
अथवा रात्री विरामदात्री त्यागुन कामीं आर्य ॥
होति विकर्तनतापा सादर दाविति हें आश्चर्य ॥ ३३ ॥
अथवा विजयी भास्कर येतो संहारित अंधार ॥
यास्तव हर्षें मंगल गाइत करिती जयजयकार ॥ ३४ ॥
अथवा निशिथीं आश्रय करुनी पांथ अतां हे जाती ॥
गरज संपतां न पुसे कोणी विस्मय कीं दावीती ॥ ३५ ॥
अथवा पाहुन नदीतटाकीं समाज नरनारींचा ॥
बोलुन ह्मणती प्रसंग टळला निर्जननिशाचरींचा ॥ ३६ ॥

अथवा साधुजनादिक यांहीं बसुन बुडाशीं थोर ॥
धुन्या लाविल्या त्यांचा ह्मणती नको नको कटु धूर ॥ ३७ ॥

अथवा माळी आदिकरुन जन पुष्पफळें तोडून ॥
लुटितिल आतां ह्मणुनी कांपती स्वमनीं भय पावून ॥ ३८ ॥

अथवा अन्य स्थलीं कलोदय निजपतिसुधाकराचा ॥
होतो तरि तद्वियोग आह्मां ह्मणती काय सुखाचा! ॥ ३९ ॥

खळखळ खळखळ वाहे कोठें शांत नदीचें पाणी ॥
निर्मळ कोठें शेवाळानें झालें ओंगळवाणी ॥ ४० ॥

हजलीं तीरीं कितीक पुलिनीं हिरविगार लोहाळीं ॥
ज्यांत हिंडती भक्ष्य धुंडण्या बदकें सफेत काळीं ॥ ४१ ॥

कितीक तरती जलांत त्यांचीं प्रतिबिंबें त्यां खालीं ॥
तत्सम दिसती जणु कमलांची सहजीं शोभा आली ॥ ४२ ॥

पोहत असतां बदकें उदकीं लहरा रांगोरांगें ॥
नागमोडिनें चिमळ्याकृति त्या दिसती त्यांच्या मागें ॥ ४३ ॥

पूजा समयीं वाहियलेलीं पुष्पें जीं लोकांहीं ॥
परोपरीचीं इकडेतिकडे तरती तीं लहरांहीं ॥ ४४ ॥

कितीक तीरा जवळ लागुनी शोभति जागोजागीं ॥
रम्य हरिद्राकुंकुममिश्रित फेंसासह बहुरंगी ॥ ४५ ॥

डोहामध्यें मत्स्य पोहती स्वेच्छ पुच्छ वळवीत ॥
कितीक उसळ्या खाउन मोत्या परि बिंदू उडवीत ॥ ४६ ॥

ऐशी रम्य नदी हे वाहे ख्याता ह्या नावाची ॥
प्रसिद्ध तिजला दुसरी मिळते सरस्वती वांकांची ॥ ४७ ॥

जणुं ते अपुली भगिनी अपुल्या चाललि पतिगेहास ॥
ह्मणोनि आली तिला सिमेवर वाटे भेटायास ॥ ॥ ४८ ॥

संगम झाला भेट परस्पर दोघींची होऊन ॥
तेथें श्रीसंगमेश्वराचें देवालय प्राचीन ॥ ४९ ॥
विलसे सुंदर नीटनेटकें साधे ज्यांत बसून ॥
करिती जन अभिषेक पुजा किति धूपदीप उजळून ॥ ५० ॥
नमस्कार किति करिती भावें हस्तपाद जोडून ॥
किती प्रार्थिती "हरहर शंकर शिव शंभो" गर्जून ॥ ५१ ॥

श्लोक

दोआवीं अति रम्य बाग दिसतो आंबे कुठे कर्दळी ॥
कोठें शेवंति कुंद जांब बकुळी सीताफळी जांभळी ॥
दाळिंबी कंवठी गुलाब कुसरी झाडें वदावीं किती ॥
कांही पल्लवपुष्पयुक्त लसती कांहीं फळें वांकती ॥ ५२ ॥
बागाच्या कुंपणावरी चंहुकडे लाहान मोठीं घरें ॥
कोळ्यांनीं अपुल्या विशाल उदरा पासूनिया पांढरे ॥
तंतू बारिक लांब लांब बरवे काढून अत्युत्तम ॥
कौशल्यें विणिलीं किती नवजुनी आहेत जाळ्यासम ॥ ५३ ॥

चक्राकृती रुंदनिरुंद वर्तुळें ॥
लहान मोठीं जणु कापुशी विळें ॥
आल्हाद देती दंवबिंदु लोंबले ॥
त्याच्यांत कोळीहि दबून बैसले ॥ ५४ ॥

आर्या

ऐशीं जाळीं सुंदर कोळी विविधाकृती किती विणती ॥
क्वचितेकांत परस्पर तंतू जोडून पूल जणु करिती ॥ ५५ ॥

श्लोक

कोळि त्या निज जाळियांत दपून बैसति चुप्पसे ॥
लक्षितात दुरून भक्ष्य बरून भासति साधुसे ॥

संतुजाल न जाणतांच विशंक चालति पांथसे ॥
मक्षिकादिक त्यां वरून तयास नाडिति चोरसे ॥ ५६ ॥

झाडि चौंकडे दाट लागली ॥
उंच मंदिरें तींत चांगलीं ॥
शुभ्र शोभती घुमट गोजिरे ॥
दिव्य कांचनी कळस साजिरे ॥ ५७ ॥

जाऊनिया उपवनीं वनभोजनातें ॥
केल्यास पाप हरतें बहु पुण्य होतें ॥
दाटी स्त्रिया पुरुष यांचि ह्मणुन खालीं ॥
ती आंवळी फलभरें अति नम्र झाली ॥ ५८ ॥

गुलाबाचे तरुते विकसित फुलें रम्य दिसती ॥
तशा कुंदाच्या ही उमलुन कळ्या गुच्छ लसती
सुगंधीनें त्यांच्या मधुर अवघा बाग घुमला ॥
मधू प्राशूं त्यांच्या वरुन अलिचा पुंज बसला ॥ ५९ ॥

तनू झडुन वाळली फिकट तेज नाहीं मुखीं ॥
सदैव मृदु मानसीं झुरतसे पतीपारखी ॥
अशा विरहिणी परी मधुपथा लता लक्षिती ॥
चमेलि जुइ मोगरी कुसरि मोतिया मालती ॥ ६० ॥

झाडें समस्त रविच्या किरणीं धुन्यांत ॥
सर्वत्र शोभति जणो ढग अंबरांत ॥
मध्यें घुसून जंव हालवि त्यांस वारा ॥
पुष्पें फळें लसति तीं जणुं दिव्य तारा ॥ ६१ ॥

आर्या

वृक्ष न हालति हे जणुं पाहुनि उदयाचलींच रवि दुरुनी ॥
होउन विनम्र सोडिति तुहिनार्घ्ये पलवांजल्या भरुनी ॥ ६२ ॥

किती झोंक तो पाउलें टाकण्याचा ॥
किती नेटका डौल ही नेसण्याचा ॥
पदीं रम्य तो घोळ लोळे निऱ्यांचा ॥
करी घोळ तो साधुंच्या ही मनांचा ॥ ८१ ॥

पथिं हिची हिजला सखि भेटली ॥
वदत हे तिस "गे बरि भेटली" ॥
कटितटीं घडली तिशिं बोलते ॥
रुळत मोंति नथेंतिल घोळिते ॥ ८२ ॥

किती गोड तें बोलणें! ऐकतांना ॥
पडे मोहनी लाज आणी पिकांना ॥
जरी भाबडा थाट सासूरवासी ॥
चकोरांस तें चंद्रिका त्याज्य कैसी ॥ ८३ ॥

उभी राहुनीया ह्मणे ते सखीला ॥
किती सांगुं गाऱ्हाणि बाई तुह्माला ॥
सदा सासु गांजून बोले अनेक ॥
सुखाचा न मेला कधीं शब्द एक ॥ ८४ ॥

इथें कांहिं बोलावया लागल्यास ॥
ह्मणावेंच माला "उगा चुप्प बैस" ॥
असा कांहि बाई न चाले उपाय ॥
दिसाया मुकी गाय पोटांत पाय ॥ ८५ ॥

पहा दूसरी रांगडी नार कोणा ॥
असे चालली हे रतीसौख्यखाणी ॥
शिरीं ओडणी रेशमी आसमानी ॥
प्रभा इंदुची फांकली तीमधोनी ॥ ८६ ॥

दिसे भांग तो अंबरीं शुद्ध गंगा ॥
प्रभाधिक्य मुक्ताभरें तत्तरंगा ॥

कितीक आल्या स्त्रिया सुंदरा नगरांतुन पुलिनांत ॥
जमल्या जणुं त्या विवाहकालीं रवि पूजूं सिमांत ॥ ७४ ॥

आर्या

युवती रतिरूपवती नरमृदुमनकर्षका नदी वरती ॥
जातां बहुविध लीला सहजीं मार्गांत रम्यशा करिती ॥ ७५ ॥

श्लोक

निऱ्या वामहस्तीं गती हस्तिनींची ॥
झुले शालुपल्ला ध्वजा ते स्मराची ॥
कशी थाटमाटें मृगाक्षी नदीला ॥
असे चालली हे पहा रम्य बाला ॥ ७६ ॥

चालतां हळूहळू पदिं वाजती ॥
जोडवीं ठपठपां श्रुति कर्षती ॥
शोभती कटितटावरि घागरी ॥
कोणि घे धुणि धुण्या करितां करीं ॥ ७७ ॥

मार्गीं टणत्कार चि जोडव्यांचा ॥
होई गमे तो स्मरकार्मुकाचा ॥
कांखेत हे मोट नव्हे धुण्याची ॥
नेते मनें बांधुन कामुकांचीं ॥ ७८ ॥

पाउलें झटझटां धरणी वरी ॥
ठावतां उमटलीं अति गोजिरीं ॥
न्यास ते जणु हुबेहुब रेखिले ॥
कामुकीं तसबिरींत चि लेखिले ॥ ७९ ॥

अहा! कोणि पाणी भरोनी नदीला ॥
पहा येत आहे स्वगेहा सुशीला ॥
धरी दांतिं पल्ला नव्या लूगड्याचा ॥
गमे भाव दावीतसे चुंबनाचा ॥ ८० ॥

किती शौक तो पाउलें टाकण्याचा ॥
किती नेटका डौल ही नेसण्याचा ॥
पदीं रम्य तो घोळ लोळे निऱ्यांचा ॥
करी घोळ तो साधुंच्या ही मनांचा ॥ ८१ ॥
पथिं हिच्ची हिजला सखि भेटली ॥
वदत हे तिस " गे बरि भेटली " ॥
कटितटीं घडली तिशिं बोलते ॥
रुळत मोंति नथेंतिल घोळिते ॥ ८२ ॥
किती गोड तें बोलणें! ऐकतांना ॥
पडे मोहनी लाज आणी पिकांना ॥
जरी भावडा थाट सासूरवासी ॥
चकोरांस तें चंद्रिका त्याज्य कैसी ॥ ८३ ॥
उभी राहुनीया ह्मणे ते सखीला ॥
किती सांगु गाऱ्हाणि बाई तुह्माला ॥
सदा सासु गांजून बोले अनेक ॥
सुखाचा न मेला कधीं शब्द एक ॥ ८४ ॥
इथे कांहिं बोलावया लागल्यास ॥
ह्मणेंच्च माला " उगा चुप्प बैस " ॥
असा कांहि बाई न चाले उपाय ॥
दिसाया मुकी गाय पोटांत पाय ॥ ८५ ॥
पहा दूसरी रांगडी नार कोणी ॥
असे चालली हे रतीसौख्यखाणी ॥
शिरीं ओडणी रेशमी आसमानी ॥
प्रभा इंदुची फांकली तीमधोनी ॥ ८६ ॥
दिसे भांग तो अंबरीं शुद्ध गंगा ॥
प्रभाधिक्य मुक्ताभरें तत्तरंगा ॥

भुजंगीच वेणी रुळे पृष्ठभागीं ॥
अनंगास जागें करी कोमलांगी ॥ ८७ ॥

कपाळा वरी कांठ शोभे जरीचा ॥
मधें टीकला रेखिला पिंजरीचा ॥
जरीकांठ तो चाप कीं कांचनाचें ॥
निळ्या भ्रूगुणीं जोडिलें मन्मथाचें ॥ ८८ ॥

नवा घागरा ल्यालि कोणी सुरंग ॥
तटाटे स्तनीं कंचुकी पीत तंग ॥
घडा मस्तकीं हस्त दक्षीण ठेवी ॥
तया सांवरूं, वाम झोकें झुकावी ॥ ८९ ॥

नपुरें छुमछुमा पदिं वाजती ॥
[illegible] ॥
[illegible]री ॥
मोहती नगरवे जन अंतरीं ॥ ९० ॥

किती बुर्खे घेती मुखविधुस झांकून पुढती ॥
किती नेत्रीं बोटें धरुन पदरांतून बघती ॥
किती गाणीं गाती मधुरतर एकत्र सवनी ॥
किती प्रेमें गोष्टी वदति घडलेल्या स्वसदनीं ॥ ९१ ॥

## आर्या

यद्देशी परदेशी नरनारी येउनी नदीवरती ॥
प्रेमें प्रभातकालीं स्नानें जप पूजनादि हो करिती ॥ ९२ ॥

## अभंग

पंच्या धोतर पामरी ॥ उपवस्त्र कांहीं तरी ॥ ९३ ॥
घेवोनिया खांद्यावरी ॥ जाती उदका भीतरी ॥ ९४ ॥
पाणी सारोनियां करीं ॥ कोणी डूबक्या हो मारी ॥ ९५ ॥

कटी जानू वेरीं पाणी ॥ होतां थबकती कोणी ॥ ९६ ॥
कोणी वांकोनी खालती ॥ आंगावरी पाणी घेती ॥ ९७ ॥
कोणी त्यांत पोहताती ॥ कोणी तीरीं च बैसती ॥ ९८ ॥
कोणी मुखें गर्जताती ॥ हरगंगे भागीरथी ॥ ९९ ॥
कोणी अंगुष्टे श्रवणीं ॥ नेत्रीं मध्यमा तर्जनी ॥ १०० ॥
नाका वरी कनिष्टिका ॥ ठेवोनिया अनामिका ॥ १०१ ॥
बुड्या मारिती खालती ॥ कोणि संकल्प सोडिती ॥ १०२ ॥
कोणी आंग चोळिताती ॥ कोणी जानवें घांशिती ॥ १०३ ॥
कोणी शेंडीतें झाडिती ॥ कोणी धोतर पिळीती ॥ १०४ ॥
हस्तस्वस्तिकें गोजिरीं ॥ मांडोनिया उरावरी ॥ १०५ ॥
स्त्रिया बैसल्या हो तीरीं ॥ कित्ती उभ्या घांटावरी ॥ १०६ ॥
दांतीं धरोनी पदर ॥ आंग चोळूनी सुंदर ॥ १०७ ॥
कोणी कंचुक्या काढिती ॥ उडे पदर लाजती ॥ १०८ ॥
कोणी टिका ठुशियांचे ॥ नवे गोंडे रेशिमाचे ॥ १०९ ॥
पंचरंगी फुंदेदार ॥ उंच खोपे बुचड्या वर ॥ ११० ॥
ठेवोनिया पुष्पाकृती ॥ गळ्या खालीं पाणी घेती ॥ १११ ॥
कोणी वस्त्रें भीजविती ॥ गार थंडी कुडकूडती ॥ ११२ ॥
अंग थरारोनी किती ॥ ॥ भीती "अगाई" बोलती ॥ ११३ ॥
कोणी करोनियां स्नान ॥ ओचे पिळिती जपून ॥ ११४ ॥
कोणी ओणव्या वांकती ॥ आंग पदरें पुशिती ॥ ११५ ॥

श्लोक

कोणी स्नान करून आर्द्र वसनें नेसून, एका करीं ॥
तांब्या स्वच्छ जळें भरून दुसऱ्या हातीं पिळा सवारी ॥
कोणी बाजुवरी धरून अणिली धौतांबरें नेसती ॥
कोणी दोन्हि करीं धुणी धडधडा शीलावरी झोडिती ॥ ११६ ॥

कोणी लाल बसंति शुभ्र पिवळीं काळीं निळीं जांभळीं ॥
वस्त्रें ताणुन नेटकीं चहुकडे वाळावया टाकिलीं ॥
वायूरोधक ठेविले कुठकुठे पाषाण त्यांच्या वरी ॥
देखावा पुलिनांत रम्य दिसतो पुष्पांपरी अंबरी ॥ ११७ ॥
कोणी भस्म सुकें तसें भिजविलें भाळीं अहा! चर्चिती ॥
कोणी वैष्णव गोपिचंदन ढिळें मुद्रावली रेखिती ॥
कोणी घेउन दर्भ मार्जन करी दे कोणि अर्घ्यांजल्या ॥
कोणी वांकुन अर्कबिंब बघती कोणी पिटी अंगुल्या ॥ ११८

## आर्या

सज्जन सुविद्य सुगुणी सुविचारी मधुरभाषणी मुदित ॥
व्यवहारदक्ष सुकृती युद्धकलानिपुण उद्यमी नियत ॥ ११९
सी. एस. आय. पदांकित, श्रीमत्सरकार होळकर यांचे ॥
सेनानायक बक्षी-साहेब खुमानसिंह नावाचे ॥ १२० ॥
त्यांना बहुमानसुहृत्प्रेमस्मरणार्थ चार पद्यें हीं ॥
कार्तीकस्नानाभिध समर्पितों सविनयादरोत्साहीं ॥ १२१ ॥

---

एप्रिल सन १८८१ इसवी

# गांवढ्यांतील सायंकाळ आणि चावडी.

दिंड्या

राजबलवाडा ह्मणुन माळव्यांत ॥
असे कसब्याचा एक गांव त्यांत ॥
माळि उदमी किरसान जाति कैक ॥
कष्टकरणारे वसति बहुत लोक ॥ १ ॥

घरेंदारें रमणीय टूमदार ॥
ग्रामशोभा ते तोषवी अपार ॥
लिंब पिंपळ वड चिंच चुतादीक ॥
वृक्ष छत्राकृति शोभती अनेक ॥ २ ॥

प्रभा संध्याकालीन अंबराची ॥
लाल पिवळी निळी विविध सुरंगाची ॥
त्यांत नानाकृति रम्य तूलराशी ॥
देति शोभा ढग चलित बहू खाशी ॥ ३ ॥

दीप्त दिसताती सकल वृक्षपानें ॥
सूर्य किरणांच्या पीत सुरंगानें ॥
विरळ ढाळ्यांतुन किरण आंत येती ॥
ज्यांत अणुरेणू उडत शोभताती ॥ ४ ॥

रम्य गोधूलक शुभ सुमुहूर्ताचा ॥
समय रजनी-विधु-संगमोत्सवाचा ॥
प्राणि मनुजादी क्रमिति पथगृहाचा ॥
वऱ्हाडी ते जणुं थाट विवाहाचा ॥ ५ ॥

सर्व दिनभर रानांत चरोनीया ॥
स्वैर पशुपक्षी तृप्त होउनीया ॥

सांज पडतां विश्रांतिसौख्य घ्याया ॥
सुखें वळती निज वस्तिकडे जाया ॥ ६ ॥
विहग येती ते उडत आतिभोंतीं ॥
शब्द करिती बहु किलकिलाट होती ॥
किती निश्चल कोठयांत बैसताती ॥
किती त्यांतुन बाहेर येतिजाती ॥ ७ ॥
थवे कावळे करित कावकाव ॥
सुखें आक्रमिती वृक्षशिरीं ठाव ॥
जटिल पादप विस्तीर्ण तो वडाचा ॥
काक बसल्यानें कृष्ण दिसे साचा ॥ ८ ॥
वटस्कंधीं त्या वाघळें लटकलेलीं ॥
सुटुन पळती चरण्यास भुकेलेलीं ॥
चपल पाकोळ्या इतस्ततः वेगीं ॥
स्वेच्छ उडती मिसळून जागजागीं ॥ ९ ॥
चित्र चिमण्या चिमुकल्या जमावांनीं ॥
करित चिवचिव उडतात भराऱ्यांनीं ॥
शेर निवडुंगें निबिड त्यांत त्यांची ॥
असति घरटीं बहु सुबक चातुरींची ॥ १० ॥
घरें ओळखुनी कैक आपुलालीं ॥
थेट घुसती त्यांच्यांत चपल चालीं ॥
किती उपरी भांडती आपसांत ॥
स्वीय सत्तेविण हीच गति जगांत ॥ ११ ॥
कळप ढोरांचे चरुन वनांतूनी ॥
परत येतां गोवारि सुखावूनी ॥
कोणि पावे मंजूळ वाजवीती ॥
कोणि सुस्वर "डह" शब्द करुन गाती ॥ १२ ॥

धेनु पुच्छें उचलोनि धांवताती ॥
हंबरोनी वत्सांस बाहताती ॥
सांड डिरक्या फोडून पदीं माती ॥
उडविताती किति मस्त झुंजताती ॥ १३ ॥

किती निरखुन ते तरुण पुष्ट गाई ॥
धुंद बागडती येउनी उपाई ॥
प्रेम पौरुष लीलादि निज लगामीं ॥
स्त्रिया गोवूं पाहे न कोण कामीं ॥ १४ ॥

खपुन अवघा दिन शेतकरी शेतीं ॥
थकुन तिनिसांजे परत गृहा येती ॥
कोणि डोक्यावर हाळ घेतलेले ॥
कोणि हांकित बैलांस चाललेले ॥ १५ ॥

कोणि खांदा आसूड दोरखंड ॥
मोट पाठीवर घेउनी प्रचंड ॥
कोणि घांसाचे थोर शिरीं भार ॥
घेतलेले किति भाजि भरुन हारे ॥ १६ ॥

कोणि बाळें तान्हुलीं पाटिमाजी ॥
जणों निजवोनी पाळण्यांत चोजीं ॥
शिरीं घेउनि चालल्या ग्रामनारी ॥
पदीं बिछुवे वाजती झणत्कारी ॥ १७ ॥

म्हणति संसारीं स्त्रिया पुरुष यांचा ॥
असे जोडा सुखदुःख विभागाचा ॥
दाविती तो सहचारिपणा नारी ॥
येथ कांतांसह खपुन घरींदारीं ॥ १८ ॥

कोणि धान्याचा भरुन भव्य गाडा ॥
येत आहे हांकीत तो घडाडा ॥

कोणि काठी टेकीत मंद चाले ॥
वृद्धबावा पाठीस पोंक आले ॥ १९ ॥

ढोंकऱ्याला त्या बघुन मुलें कोणी ॥
जमुन थट्टेनें करिति छेडकाणी ॥
चिडुन तेव्हां तो जांबुवंत बावा ॥
मारुं धावे तों हंसती तीं वहावा ॥ २० ॥

अशा गमतीनें गांवकुसापाशीं ॥
लोक येती तों मौज गमे खाशी ॥
मुलें खेळत जीं वेशिपुढें होतीं ॥
जणों सामोरिंच आलिं तयां हो तीं ॥ २१ ॥

मुखें चिमणीं गोजिरीं रम्य नेत्रें ॥
हस्त पादादी निटस सुदृढ गात्रें ॥
टोपि घातलिसे कोणि आंगडींच ॥
कोणि वस्त्राविण उघडि नागडींच ॥ २२ ॥

वस्त्र नाहीं तें नांव घ्यावयाला ॥
दागिन्यांचें हो पाहिजे कशाला ॥
तरी कोणाच्या कांचमणि गळ्यांत ॥
असति तांब्याच्या तायत्याहि त्यांत ॥ २३ ॥

सती सटवाई जीवती अशांचीं ॥
रौप्य पदकें तीं ढोबळीं ठशांचीं ॥
असति कोणाच्या गळ्यामधें टांक ॥
ज्यांस पितऱ्या हो ह्मणति पौरलोक ॥ २४ ॥

खेळ खेळति तीं कोणि विटीदांडू ॥
कोणि लंगोऱ्या उडविताति चेंडू ॥
गाडिभिंगोऱ्या फिरत नाचताती ॥
कोणि लंगडशाईत कुदत जाती ॥ २५ ॥

गाल दोन्ही फुगवूनि वर बुक्यांनीं ॥
वाजवीती किति ओंठ अंगुल्यांनी ॥
कोणि खेळति हो लपंडाव मात ॥
एकमेकांची पाठ शीवतात ॥ २६ ॥

अश्व काठीचे करुन धांवताती ॥
कोणि कौलाची गाडि ओढितातीं ॥
कोणि दोरी बांधून कांबटीस ॥
तीर उडविति जोडून धनुकलीस ॥ २७ ॥

करुन लुटुपटुचे खेतमळे कोणी ॥
खेळ खेळति हो त्यांत जणु खपोनी ॥
मायबापांचें वळण लेंकरांना ॥
सहज लागे तें स्पष्ट इथे जाणा ॥ २८ ॥

कोणि बाजूला बसुन पहातात ॥
मौज खेळांची कशी हारजीत ॥
एकमेकांचे धरुन कोणि हात ॥
मधुर वचनें बोबडीं बोलतात ॥ २९ ॥

कोणि डोळे वाटेस लावुनीया ॥
दूर हेरीती सुव्हद भेट व्हाया ॥
मायबापां बघतांच कोणि धांवे ॥
त्वरित बिलगाया तयां प्रेमभावें ॥ ३० ॥

आधि बोलावें आधि मुके घ्यावें ॥
आधि उचलोनी अंकिं बैसवावें ॥
धरुन हेवा हा कोणि मानसांत ॥
एक मेकांच्या पुढें धांवतात ॥ ३१ ॥

कोणि " बाबा हो " ह्मणुन धरी हात ॥
कोणि खावाला ओळकंवतात ॥

कोणि पाठीवर चढुन मिठी मारी ॥
कोणि दाढीचे केंस धरुन हेरी ॥ ३२ ॥
किती उत्कंठित ह्रदयिं मायबापें ॥
घट्ट आलिंगिति त्यास त्या हुरूपें ॥
प्रेम-वात्सल्यें कोणि मुके घेती ॥
कोणि कडिये उचलून बैसवीती ॥ ३३ ॥
अशा प्रेमोल्हासांत मग्न मोहीं ॥
मुलांबाळांसह सर्व येति गेहीं ॥
कोणि ओझीं हाळादि आणिलीं तीं ॥
खालिं ठेवोनी भारमुक्त होती ॥ ३४ ॥
"हुश्श" म्हणुनी मग बसति कोणि शांत ॥
कोणि ढोरें गोठ्यांत बांधितात ॥
कोणि टाकीती तयांपुढे चारा ॥
कोणि गाईम्हशि दोहिती दरारा ॥ ३५ ॥
कामकाजें हीं उरकुनी निवांत ॥
होति होई तों दोन घडी रात ॥
कोणि परसे शेकार्थ पेटवोनी ॥
बसति चैनीनें पाय लांबवोनी ॥ ३६ ॥
मुलें भंवतालीं बसुन कौतुकांत ॥
प्रेमभावें अति गोष्टि बोलतात ॥
कोणि देती जांभया झोंप येतां ॥
कोणि डुलती पेंगेत गुंग होतां ॥ ३७ ॥
खानपानाची करुन तों तयारी ॥
जेउं बोलाविलि त्यांस चतुर नारी ॥
कोणि गृहकृत्यें आटपोनि शेत ॥
जाति राखाया, कोणि चावडींत ॥ ३८ ॥

क्षेत्रपाळाच्या ग्रामदेवळांत ॥
असे मौजेची चावडी पुऱ्यांत ॥
सुबक कौलारू नेटकें लहान ॥
देवमंदिर तें पौरसुखस्थान ॥ ३९ ॥

पुढें आंगावर चढुन शेंदराचीं ॥
भव्य मूर्ती प्राचीन मारुतीची ॥
उभी शोभे वर असुन एक हात ॥
जणों आशी " स्वस्त्यस्तु " अशी देत ॥ ४० ॥

पुढें देवाच्या घांट पीतळेची ॥
दांडि मोरांच्या जीस पिसाऱ्यांची ॥
शंख ज्याचा आवाज हो गभीर ॥
धूपदीपारति असति अशीं थोर ॥ ४१ ॥

दीप उजळे बाजूस ठाणवींत ॥
करित टिकटिक बारीक मंद जोत ॥
तेल दीपाचें नित्य गळुन खालीं ॥
स्वयंभू ते शनिमूर्ति जणों न्हाली ॥ ४२ ॥

उभा भिंतीशीं रोंविला त्रिशूल ॥
असे लोंबत खुंटीस मोरचेल ॥
शब्द धुमधुम गंभीर वाजणारा ॥
एक भिंतीशीं थोरसा नगारा ॥ ४३ ॥

खडू गेरूच्या रंगरेघऱ्यांचीं ॥
ऱ्हस्व दीर्घाकृति मनःप्रमाणाचीं ॥
चित्र चित्रें काढिली कीरमोर ॥
असति भिंतीवर विविध चमत्कार ॥ ४४ ॥

देवळाशीं लगटून वाढलेला ॥
जाड खोडाचा खांदि वांकलेला ॥

# प्रेमालाप.

## प्रकरण १

## विरहिणीमानसोद्गार.

आर्या

जातां दयित विदेशा दयिता सद्गुणविलास विविधपरी ॥
आठवुनी ध्यानिं मनीं प्रेमें बाहीं जशी घना मयुरी ॥ १ ॥

श्लोक

तुझी मूर्ति ध्यानीं सतत रमते रे प्रियकरा ॥
दुजें कांहीं राया तुजविण सुचेना चि चतुरा ॥
विलोला हे दासी पदकमल पाहूं झुरतसे ॥
कधीं भेटीचा तो सुदिन बरवा प्रार्थित असे ॥ २ ॥

साकी

प्राणनाथ तूं तव चरणाची दासी मी गुणिराया
दयासागरा कृपा करोनी दावी निजपदठाया ॥ ३ ॥

दिंड्या.

सर्व भुलल्यें आपुलें देहभान ॥
नित्य ह्रदयीं बिंबलें तुझें ध्यान ॥
बाण प्रीतीचा टोंचितो विमोहीं ॥
प्रखर दुसरा कीं असा बाण नाहीं ॥ ४ ॥

तुझ्या प्रेमीं निस्संग मी चकोर ॥
दुजा माझ्या परि कोणि ना फकीर ॥
वेड भरलें अति नसे मला ज्ञान ॥
विश्व भासतसे शून्य तुझ्यावीण ॥ ५ ॥

बहुत उत्कंठा मनीं प्राणनाथा ॥
कधीं वाहिन तव पदांबुजीं माथा ॥
विरहदुःखें घाबरी दिवसरात ॥
पूर नेत्रीं ढळढळां अश्रुपात ॥ ६ ॥

काय नकळे अपराध असा माझा ॥
करी छायेचा पदर दूर तूझा ॥
क्षुद्र विव्हल ह्या जिवा निराधारा ॥
प्रिया पदरीं घे भेट दे उदारा ॥ ७ ॥

ह्रदयदुःखा ह्या कोण वारणार ॥
नसे वैद्याचा शक्य तदुपचार ॥
असें होतें तर तुझ्या पदीं शार ॥
वाहतां कां मारिली न समशीर ॥ ८ ॥

भक्तिपंथें जातात जे तयांस ॥
मिळे मुक्तीच्या सौख्यपदीं वास ॥
भक्ति शल्या परि मर्दतरीं तींच ॥
भोगवीते कां विविध परी जाच ॥ ९ ॥

प्रथम पदरीं घेउनी दीनदास ॥
पुढें लोटावें अभरवशीं त्यास ॥
उचित नोहे थोरांस हें विलोकीं ॥
काय मेल्या मारून शौर्य लोकीं ॥ १० ॥

प्रिया माझ्या श्रीमंत महाराजा ॥
मी न योग्य तव चरणदास्यकाजा ॥
दयासिंधो घेतलें पल्लवांत ॥
बिरुदलज्जा ती वागवीं मनांत ॥ ११ ॥

तुझ्या चरणींची धूळ एक मूठी ॥
मिळो मजला दुजि नको जडीबूटी ॥

प्रिया आतां धरवे न मला धीर ॥
नको भेटीला लाउं तूं उशीर ॥ १२ ॥

श्लोक

उबगल्यें तुजविणें अति मंदिरीं ॥
जणुं जळाविण वनीं नव वल्लरी ॥
विकलता सकल तापद हो मशीं ॥
प्रियकरा गुणनिधे कधिं भेटशी ॥ १३ ॥

तळमळे निशिदिनीं विरहानळीं ॥
कशि जगेल वनाविण मासळी ॥
सदन हें वन च वाटतसे मशीं ॥
प्रियकरा गुणनिधे कधिं भेटशी ॥ १४ ॥

पद १५

( राग जिल्हा; ठुंबरीची धाटी. )

पतिविण पळें युगें सखु होतीं ॥ लोटुं कशा दिनराती ॥ प० ॥धृ०॥
निशिदिन झुरत्यें मोराबाणी ॥ पाहुं ग वाट किती ॥ पति वि० ॥१॥
विनोदक्रीडा वांचन वेळा ॥ जय न शीघ्र-गती ॥ पति वि०॥ २ ॥

पद १६

( राग यमनकल्याण; ख्यालची धाटी. )

सखु रजनी ही अतां लोटुं कशी ॥ पतिविण झाल्यें गडे वेडी पिशी ॥ धृ०
नीज नये गे जरा बाई मशी ॥ शेज विषारी गमे व्याली जशी ॥
तीव्र कहाली तनू पोळी शशी ॥ चित्त उदासी भ्रमे दाहीं दिशीं ॥ १ ॥
मंदीर भासे सुनें राव्या विणें ॥ आसूद धाडोनिया हें पुसणें ॥
वाट पहावी किती म्यां दारिनें ॥ सारवाण टोंची जिथीं कासाविशी ॥ २ ॥

पद १७

( राग जिल्हा; साध्यालावणीची धाटी )

अयि प्रिय निद्रे, जगसुखधात्री, हे श्रमपरिहारिणी ॥
तुला काशि मी चँ ग भयकारिणी ॥ ध्रु० ॥
नाहिं जरा ह्या चैन जिवाला निमग्न मन होउनी ॥
विरामीं देहभान विसरुनी ॥
विश्रांतीला इच्छित असतां चिंतार्णवि लोटुनी ॥
बुडविशी निष्ठुर कां होउनी ॥
विकल सर्व हीं गात्रें बाई तळमळतें कागुनी ॥
मासळी जेवि जला वांचुनी ॥
घडिपल घडिपल करितां लोटे पर्वतशी यामिनी ॥
लक्षितां वाट तुझी साजणी ॥
चाल ॥ क्षणभर ही मज शांति नसे लोचनीं ॥
ना मिळे गडे कधिं पापणिला पापणी ॥
लवती हि न त्या किंचित भरावुनी ॥
अहोरात्र हा त्रास भोगितें आळवितां पापिणी ॥
तुला काशि मी च ग भयकारिणी ॥ अयि० ॥ १ ॥
रम्य सुवासिक राजमंदिरीं गायन मधुरध्वनी ॥
सर्व ही थाट सखे सोडुनी ॥
बाइ कशी त्या भिकार ओंगळ जागीं सुख मानुनी ॥
पडशि गे रकुन्यावर ताणुनी ॥
घों घों करिती मच्छर ऐशा संत्रासीं गुंगुनी ॥
घोरशी गाढ नेत्र झांकुनी ॥
हे मतिमंदे नीचस्थिति ते वाटे प्रिय कां मनीं ॥
तुला ह्या राजविलासाहुनी ॥
चाल ॥ ह्या छपरपलंगीं मृदुतर शय्यासनीं ॥
भागशी सखे गे उत्कंठित बैसुनी ॥

पाहरा शिपाई देत जणों जागुनी ॥
श्रेष्ठ सुधेहुन नीच सुरा ती रुचिरा मनमोहिनी ! ॥
तुला कशि मी च ग भयकारिणी ॥ अयि० ॥ २ ॥

पद १८

( राग जिल्हा; ठुंबरीची धाटी. )

प्रियतम प्राणसखा गृहिं नाहीं ॥ काय करूं सखु बाई ॥ ० ॥ ध्रु० ॥
हा शिमग्याचा सण वरुषाचा ॥ आला थोर सवाई ॥प्रिय० ॥ १ ॥
कोणा सह मी अबिर गुलाल ॥ खेळूं रंगलढाई ॥ प्रिय० ॥ २ ॥
विरहाग्नीनें होळी होते ॥ तनुची थोर; अगाई ! ॥ प्रिय० ॥ ३ ॥

पद १९

(राग परजसोहनी; ठुंबरीची धाटी. )

जातो हा बहार बसंत ॥ गृहिं नाहीं कांत ॥ ध्रु० ॥
फुलबाग फुलली सुवासीक सुमनें ॥ व्यर्थ चि हीं सुकतात॥ गृहिं० ॥
घन आंबरायीं पिक शुक मैना ॥ मंजुल स्वन बोलतात ॥गृ०॥ २ ॥
शीतळ परिमळ झुळझूळ वाहे ॥ स्मरदूत-दक्षिणवात ॥गृ० ॥ ३ ॥
मन्मथशरच्युतवंजुलमंजिरी ॥ कोमल मन वेधितात॥ गृहिं० ॥ ४ ॥

पद २०

( राग बिहागाची मांज; ठुंबरीची धाटी. )

सजणा विण तापद आधिं निशी ॥ मज डागिशि कां बर तूं हि शशी ॥ ध्रु० ।
ह्मणती तव कौमुदि शीत बहू ॥ गमते भडका अति आग मशी ॥ स० ॥ १ ।
स्मरपीडित त्यां जाळिशि पोळिशी ॥ अभिधान सुधाकर व्यर्थ तुशी ॥ २
विरहीमानस झुरणिस लाविशी ॥ ग्रहणें क्षय तूं ठीकच्च वरिशी ॥ स० ॥ ३
अथवाकृति हे सहजीं करशी ॥ जडमूर्तिस योग्य च रे तुजशी ॥ स० ॥ ४.

पद २१

( राग जिल्हाखमाज; ठुंबरीची धाटी. )

येइल जिवलग प्राण ॥ गे कधिं येइल जिवलग प्राण ॥
चतुर सुगर सरदार शिपाई ॥ येइल जिवलग प्राण ॥ ध्रु० ॥
मंदिर सुंदर नामि बिलोरी ॥ रंगित नव सोनेरी गे ॥
निर्जन वनसें खाउं धांवतें ॥ मारि जिव्हारीं बाण ॥ गे कधिं० ॥ १ ॥
रमणी चिमणी नजरबाग ही ॥ फुलली प्रथम ऋतूनें गे ॥
सुमनगेंद करुं अर्पण कोणा ॥ निखळ विकळ जिव जाण ॥ गे क० ॥ २ ॥
जळो टळो ही मोहिम मेली ॥ प्राणघातकी पातकी ॥
धांव पाव रतिरमणा थकल्यें ॥ नाहीं राहिले त्राण ॥ गे कधिं० ॥ ३ ॥

## पद २२

(राग जिल्हाखमाज; ठुंबरीची धाटी.)

निष्ठुर किति तरी झाला ॥ गे प्रिय निष्ठुर किति तरि झाला ॥
निपट कपटपटु नाटकि चेटकी ॥ निष्ठुर किति तरि० ॥ ध्रु० ॥
गेल्या दिवसा पासुन कांहीं, ॥ वृत्त कळेना बाई गे ॥
नाहिं बोटभर कागद कुटका ॥ नाहिं निरोप हि आला ॥ गे प्रि० ॥ १ ॥
अहोरात्र निजध्यास लागला, ॥ क्षण कल्पासम लोटे गे ॥
स्वसम निजेनें निष्ठुर केलें ॥ स्वप्न; जिवीं जणु घाला ॥ गे प्रि० ॥ २ ॥

## पद २३

(राग जिल्हा; ठुंबरीची धाटी.)

सांगा हो संदेशा कोणी त्या ॥ जिवलग पतिला ॥ सांगा० ॥ ध्रु० ॥
विरहदवाग्नीं जळत कुरंगी ॥ धांवुनि घना या विझवूं त्या ॥ सां० ॥ १ ॥
मुखचंद्रा पाहूं क्षुधित चकोरी ॥ त्वरित सुधासें दर्शन द्या ॥ सां० ॥ २ ॥

## पद २४

(राग खमाजाची मांज; ठुंबरीची धाटी.)

वाट किति पाहुं रे ॥ प्रिया गुणनिधी वाट किति पाहुं रे ॥
तुजविण मजला चैन पडेना ॥ तुजविण मजला चैन पडेना ॥

मदनकहालि किति साहुं साहुं ॥ गुणनिधि वाट० ॥ ध्रु० ॥
निशिदिन शिणले नयन चरण ॥ यिप्रा निशिदिन० ॥
वदत तृषित बहु चातकि प्रिय प्रिय ॥ वदत तृषित०
वर्ष वर्ष मम घना त्वरित ये ॥ वर्ष वर्ष मम घना०
विरहदाविं कशि राहुं राहुं ॥ गणनिधी वाट० ॥ १ ॥
अशि तरि तुजला कोण मिळाली ॥ प्रिया अशी तरि० ॥
सवत चतुर जिनें मोहनि घातली ॥ सवत चतुर जिनें०
वार वार भ्रम भ्रमरी भ्रमरा ॥ वार वार भ्रम भ्रमरी०
वेकल जीव किति बाहुं बाहुं ॥ गणनिधी वाट० ॥ २ ॥

पद २५.

( राग सोरठ; तुंबरीची धाटी. )

प्रख्याशि संदेश ॥ नाहिं जिवीं सुखलेश ॥ प्रि ॥ ध्रु० ॥
विकासत हे मधुमालात विकला ॥ लक्षी मधुपनिवेश ॥ प्रि० ॥ १ ॥
अन्न न पाणी गोड न कांहीं ॥ लागे गृह हि विदेश ॥ प्रि० ॥ २ ॥
सहचारीमनत्यक्ता काया ॥ शिणविति दुर्धर क्लेश ॥ प्रि० ॥ ३ ॥
सत्हृदय ते परत्हृदय जाणती ॥ नलगे विनाति विशेष ॥ प्रि० ॥ ४ ॥

पद २६.

( राग जिल्हा झिंजोटी; तुंबरीची धाटी. )

रिझलें मन ज्या दिवसा पासुन तुजला मनोहर पाहियलें ॥
अन्य न कोठें दिसशी त्हृदयीं नित्य ज्यास त्वां मोहियलें ॥
॥ ध्रुवपद ॥
तव लावण्या तुल्य न कोठें रम्य रूप अति पाहियलें ॥
रविशशिहुन ही तेज आगळें मदना वदनें लाजविलें ॥ १ ॥
तव दंताची दिव्य सुकांती काय प्रियकरा वानुं तरी ॥
न देखिले कधिं लालहिरे ही असे विराजित आजवरी ॥ २ ॥

अजब नेत्र तव त्द्दय वेधिती भ्रधनु चढवुन दृष्टिशरें ॥
प्रखर न इतुकें शस्त्र पाहिलें खंजिर बिछुवा वा दुसरें ॥ ३ ॥
पाहियलें जिवलगा सख्या तव रम्य रूप अति डोळे भरून ॥
लंपट होउन जीव टाकिला ओंवाळुनियां त्याजवरून ॥ ४ ॥
धनदौलत तूं प्राणनाथ ही सर्व काय तें तूं असशी ॥
इष्क तुझा मम त्द्दयिं बिंबला प्रीय न कांहीं अन्य मशी ॥ ५ ॥
सोडुन सुखसंसार फकीरी घेउन देश विदेश वनीं ॥
धुंडु किती तरि जीव शीणला शीघ्र भेट शिरताज धनी ॥ ६ ॥
नित्य ज्यांस तव दर्शन होतें धन्य भाग्य तन्नयनांचें ॥
पंत ह्मणे कां झोंप घेतसे कर्म अजुन ह्या दीनांचें ॥ ७ ॥

पद २७.

(राग जिल्हा; गजलाची धाटी)

प्राणनाथ ध्यानिं मनीं दिवस यामिनी ॥
तुझा निजध्यास सख्या लोल दर्शनीं ॥ ध्रु० ॥
मदन रूप रम्य तुझी मूर्ति मोहनी ॥
गोड बोल गुण कृति स्मरण होउनी ॥
मूर्तिमंत दिससि वससि रमसि लोचनीं ॥ प्रा० ॥ १ ॥
सदोदीत काळजींत झुरतसें मनीं ॥
प्रिया निरवळ छंद तुझा बहुत लागुनी ॥
श्रांत अती शांत करीं तळमळे मिनी ॥ प्रा० ॥ २ ॥

पद २८.

(राग भैरवी; ढुंबरीची धाटी)

दर्शन दे गुणिराया ॥ दासी वर कर छाया ॥ दर्शन० ॥ ध्रु० ॥
मार्गप्रतिक्षा हीच निशीं दिनीं ॥ वंदिन कधीं तव पायां ॥ द० ॥ १ ॥
कर जोडुनिया विनवितसें प्रिया ॥ ने त्वरे मज निज ठायां ॥ द० ॥ २ ॥

# प्रकरण २.

## वियोगविभ्रम.

श्लोक

। विदेशीं प्रिय मोहिमेला ॥
घोळून कांतस्थिति अंतरंगीं ॥ झालीच वेडी विरहें कुरंगी ॥ १ ॥

आर्या

मळवट भव्य कपाळीं कळकट तनु सूक्ष्म लोंबती झिपऱ्या ॥
मळकट चिंध्या लुगडें गाणीं गाईत वेंचिते कपऱ्या ॥ २ ॥
ऐशी वेडी बाई एक अह्मी भडकतां अहोरात्र ॥
पाहियली, वृत्त तिचें ऐकुन सावंत वाहतां नेत्र ॥ ३ ॥
कळलें सगळें तें मज दुसऱ्या बाई कडून हो मित्र ॥
कथिलें असे पुढें तें ऐकावें देउनी तुह्मी श्रोत्र ॥ ४ ॥

पद ५.

[राग जिल्हा; साध्या लावणीची धाटी.]

मैना बाई नाव हिचें भाग्य संपलें ॥
पतीविरहें हीस असें वेड लागलें ॥ ध्रु० ॥
हिच्या चालु काळिं हिनें वस्त्रभूषणें ॥
हिरे पाच लाल मोति जडाउ दागिनें ॥
उंचि जरीकांटि हिरवा शालु पैठणी ॥
कशीद्याचि चोळि काळि लाल बैंगणी ॥
शिरीं पुष्पजाळि भाळिं कुंकु रेखलें ॥
परीधान केलें अतां सर्व सूटलें ॥ प० ॥ १ ॥
स्वस्थ छायेखालिं घरीं बसुन राहणें ॥
शीत उष्ण यांत अतां रानिं हिंडणें ॥

केस वेणिमाजि असत नीट बांधिले ॥
अतां खालिं रुक्ष असे रुळति मोकळे ॥
न्हाण माखण करनें अतां सर्व सुटलें ॥
डोळां झोंप नाहिं हिचें चित्त वेधलें ॥ प० ॥ २ ॥

पति हिचा धारराव थोर शिलेदार ॥
उभयतांचि प्रीत वाइ काय ती अपार ॥
झालें चौदांच्या हो सालिं बंड अनीवार ॥
जाळुन पोळुन लुटुन जनां पिडा वारंवार ॥
बंडखोर यांनिं दिली त्यांवर धाडिलें ॥
सरकारानें; यास जाणें भाग जाहलें ॥ प० ॥ ३ ॥

तोफा धाड धूड सुटुन धूर कोंदला ॥
अश्व दाणादाण होति देति किंकळा ॥
तीर भाले खांडे जणु चमकती विजा ॥
हाण हाण, मार मार, शद्ब ना दुजा ॥
विजयप्राप्ति झटुन लढति दोन्हि तीं दळें ॥
असें समर डोळ्यांपुढें भासुं लागलें ॥ प० ॥ ४ ॥

शीर हात पाय पोट कापुनी किती ॥
रणीं मरुन पडुन रक्त ओघ वाहती ॥
शत्रु केक राहु जसे इंदु भवताले ॥
जमुन पतिस ग्रासुं बघति युक्ति ना चले ॥
भूक तान सोसुनियां वदन सूकलें ॥
हीचें अन्नपाणि सुटुन चित्त वहकलें ॥ प० ५ ॥

आधिं झोंप नाहिं डोळा जरा लागला ॥
तर स्वप्निं कधीं कधीं दिसावें हिला ॥
गृहीं पतीराज येउन रंगमाहलीं ॥
परोपरी त्याजसवें केलि चालली ॥

सुवासीक अष्टगंधिउटिस लाविलें ॥
आठवूनि विरहदुःख प्रेम लोटले ॥ प० ॥ ६ ॥
दिव्य कुसुम शेज नरम मंचकावरी ॥
पतीमुखीं देत विडा सगुणसुंदरी ॥
जाईजुईपुष्पकळ्या हार गुंफिले ॥
प्रेमालिंगनास देउन वदन चुंबिलें ॥
जागे होतां सौख्य सर्व विलय पावले ॥
मग चित्त भ्रमित होउन चळत चाललें ॥ प० ॥ ७ ॥
पत्र एके दिवशीं बाई आलें अवचितां ॥
काय कठिण समय ह्रदय उलतें सांगतां ॥
जळो मेला जन्म आह्मी पापि बायका ॥
पळ मुदुन समरिं हिरा हरपला सखा ॥
येतां श्रवणिं शब्द धरणि केळ कोसळे ॥
शुद्ध बुद्ध उडुन सर्व शीर फीरलें ॥ प० ॥ ८ ॥

## प्रकरण ३.

## मोहिमपत्रिका.

### आर्या.

निजवृत्त मोहिमेतुन कळवी सप्रेम कांत वीरमणी ॥
विरहीं तारुण्यभरीं भेटिपरि तेंचि शांतवी रमणी ॥ १ ॥

### श्लोक.

प्रिये पावलें गे तुझें प्रेम-पत्र ॥ ह्रदीं दाटतें वाचितां तें चरित्र ॥
वियोगें मला ही सखे स्थैर्य नाहीं ॥ कथूं काय पत्रीं तुला लेखनाहीं ॥ २ ॥
कासाविशी फार तुझ्या जिवाची ॥ पत्रीं प्रिये मीं जंव आजि वाची ॥
निराहुनी व्याकुलता मला ही ॥ वाढून देहीं जणुं होत लाही ॥ ३ ॥

वर्तमान इकडील कळावें ॥ चित्त चिंतनिं न लौंबकळावें ॥
ह्याजसाठिं सखये तुजला गे ॥ त्वद्वृत्त लिहिणे गुज लागे ॥ ४ ॥
मजविणें तुजला पल तीं युगें ॥ तुजविणें मज तीं हि तशींच गे ॥
उभय देह दिसती जरि वेगळे ॥ नजर एकच दों नयनीं मिळे॥५॥
टाकुनी प्रियतमे तुज मंदिरीं ॥ हे न मोहिम रुचे मज सुंदरी ॥
क्षात्रधर्म अति दुस्तर चाकरी ॥ कोण वीर अवमान तिचा करी ॥ ६ ॥
स्वामिचा हुकुम वंद्यच मस्तकीं ॥ बोलती विबुध हें चि समस्त कीं ॥
कामिं ये पुरुष जो समया वरी ॥ धन्य तोचि जगिं कीर्ती तया वरी॥ ७॥
आज्ञा नृपाची शिरसा धरीती ॥ कुलीन योद्धे बुध शुद्धरीती ॥
रीतीस त्या मीं अवलंबुनीया ॥ निघून आलों स्थलिं लांबुनी या॥८॥
अहोरात्र चित्तीं तुझा ध्यास लागे ॥ तुझ्या भेटिला जीव उलासला गे॥
कधीं भेटिचा लाभ होतो कळेना ॥ वियोगस्थिती हे मळा आंकळेना॥९
दिनभरी रिपुसवें समरातें ॥ करुन येउन सखे शिबिरातें ॥
करिं उपाय बहु ते सुखवाया ॥ शशिमुखी पण तुझ्याविण वांया ॥ १०
लोटितों दिन कसा तरि कामीं ॥ काळजी करित रात रिकामी ॥
नीज निष्ठुर नये नयनांसी ॥ क्लेश देउन बहू वय नाशी ॥ ११ ॥
डोळा कदाचित् जरि लागला च ॥ लागे भ्रमूं जीव हि लागलाच ॥
तंद्रेत शय्येवर वीवळावें ॥ बोलून मोहीं बहु चावळावें ॥ १२ ॥
श्रांता भयार्ता चकिता विरक्ता ॥ भ्रांतिष्ट उद्विग्न गुणानुरक्ता ॥
स्वप्नीं अशी पाहुनिया तुला गे॥ स्वांतीं विमोहें कढ ओतुं लागे॥ १३॥
होतां चि जागें अवघें सये तें ॥ कोठें न कांहीं नजरेस येतें ॥
होई तदा वृत्ति खजील भारी ॥ वेडावला जीव वियोगभारीं॥ १४॥

घोळे तुझी स्मृति सदा मन विस्मयातें ॥
पावे अति; स्थिति नये चि वदावया ते ॥
कांकीं वियोग घडिचा घडतां तुला गे ॥
व्हावेत कष्ट किति ते मनिं खाउं लागे ॥ १५ ॥

असे इथें केवळ देह साक्षी ॥ परंतु सारें लय सारसाक्षी ॥
तुझ्याकडे लागुन राहिलेंसे ॥ जिवंत मी निर्जिव बाहुलेंसें॥ १६ ॥
लाजे मनीं पाहुन चंद्र ज्यातें ॥ प्रिये तुझ्या त्या वदनांबुजातें ॥
पाहीन केव्हां मज हा असोशी ॥ वियोग हा प्राणवियोग सोशीशीं॥ १७॥

पद १८

( राग जिल्हा. ठुंबरीची धाटी. )

इच्छितों तुशी, सखे, इच्छितों तुशी भेट लौकरी ॥
तृषित जीवनार्त अतुर चातकापरी ॥ इच्छि० ॥ ध्रु० ॥
पूर्णचंद्रमा, सखे, पूर्णचंद्रमा वदन सुंदरी ॥
पाहुं, पातली, सखे, पाहुं, पातली भरतिला भरीं ॥
विरहवाडवाग्नितप्त त्दृदयसागरीं ॥ इच्छि० ॥ १ ॥
प्राणवल्लभे, सखे, प्राणवल्लभे रम्य वल्लरी ॥
चुकुन विधिबळें, सखे, चुकुन विधिबळें अलि दिगंतरीं ॥
त्रास प्रबळ सोशि तैशि गति मदंतरीं ॥ इच्छि० ॥ २ ॥

---

## प्रकरण ४.

## रुष्टप्रियविनती.

---

आर्या

रुसतां प्रिय प्रियेचा पावुन बहु ती मनांत आयास ॥
विनवी परोपरी त्या सुखजीवनदा प्रसन्न व्हायास ॥ १ ॥

पद २

( राग विहागाची मांज; ठुंबरीची धाटी ).

रुसलां अजि कां गुणिराज हरी ॥
अपराध असा मम काय तरी ॥ ध्रु० ॥

वदनीं तांबुल देतां प्रेमें ॥
बघता रागें धरिता हि दुरी ॥ रुस० ॥ १ ॥
रुसतां वराब्धि अवला सुनदी ॥
मग जीवन वाहिल कोणावरी ॥ रुस० ॥ २ ॥
करुणांबुद हे शरणागत मीं ॥
मधुरी मिनकेतनताप हरीं ॥ रुस० ॥ ३ ॥
कर जोडुनि दासि विनंति करी ॥
प्रियप्राणपते मज घ्या पदरीं ॥ रुस० ॥ ४ ॥

पद ३

( राग हमीरकल्याण; ख्यालाची धाटी )

प्रिय सजण आज कां मशि रुसशी ॥
काय घडलि सांग ती चुकी तरी ॥
कां दासी वर हा राग ॥ प्रिय सज० ॥ ध्रु० ॥
हे व्याकुल अति प्राण भुकेले ॥
दीन मीन जलहीन तळमळे ॥
भेट त्वरें घनराज भाग ॥ प्रिय० ॥ १ ॥
पंचम ऋतु मज आज नहालें ॥
शास्त्रमार्ग तुजला हि कळे ॥
देशि कधीं परिरंभ सांग ॥ प्रिय० ॥ २ ॥

पद ४

( राग परजसोहनी; ख्यालाची धाटी )

अशी सदा ही प्रीत राहुंद्या ॥
मनमोहन दातार दासि वर ॥ ध्रु० ॥
कुमुदि मुदित कशि निशीं शशिपायीं ॥
होत; प्रेम हें ज्ञात, गाति वर ॥ अशी० ॥ १ ॥
विमल सुजल जर पलभर नाहीं ॥
प्राण देत तो मीन पाणिवर ॥ अशी० ॥ २ ॥

पद ५

( राग भैरवी; ठुंबरीची धाटी. )

आळवूं किति प्राणविसाव्या ॥ बोल जरा तरि हे गुणिराव्या ॥ ध्रु० ॥
काय विकासित परिमिनि सरसा ॥ त्या मधुपाहीं मनिं दुखवाव्या ॥ आ. ॥ १
निर्मळजीवनमानसहंसा ॥ केलि रुचिर कीं नचिविसराव्या ॥ आ. ॥ २ ॥
संनिभ करुणामेध असोनी ॥ फोडित टाहो मोरि झुराव्या ! ॥ आ ॥ ३ ॥
बोल कलानिधि लोल सुधारसिं ॥ दासि चकोराविनंति वराव्या ॥ आ. ॥ ४

पद ६

( राग काफी; ठुंबरीची धाटी. )

पाहिली रात्रि कितिवाट ॥ प्राणप्रिया मी पा० ॥
एकलि निखळ विकळ तळमळ, ॥
जळत दहनीं सदनीं ॥ मी पाहि० ॥ ध्रु० ॥
शेज सुवासिक नरम कुसुम ठिक ॥
जपुन खपुन रचली चट सुकली ॥ मी पाहि० ॥ १ ॥
काय विभूषित वसन सुनग युत ॥
नटुन थटुत बसल्यें अति थकल्यें ॥ मी पाहि० ॥ २ ॥

पद ७

( राग काफी; ठुंबरीची धाटी. )

मोहिनी कोण अशि नार ॥ सांग मज ती मोहि० ॥
कामिनि चतुर सुगर रतिपति, ॥
मति जिवर अभर फिरली विरली ॥ ती मो० ॥ ध्रु० ॥
वाटतसे तुज जिविण सदन वन ॥
अशन शयन धूली विषमूली ॥ ती मो० ॥ १ ॥
गाल सुलोचन वदन सुमन तन ॥
अखिल विकल भ्रमलीं जणुं भ्रमली ॥ ती मो० ॥ २ ॥

पद ८

( राग पिलूचाजिल्हा; ठुंबरीची धाटी. )

रति रंग हसुन मशि बोला रे ॥
चंद्रकमलकळि लोला हो ॥ रति० ॥ ध्रु० ॥
विनवितसें कर जोडुनि मी, अर्पुन शीर पदीं रे ॥
किलवाणी अति पदर पसारिलें, ॥
द्या माफी हरणीला हो ॥ रतिरंग हसुन० ॥ १ ॥

पद ९

( राग बिहागाचाजिल्हा; ठुंबरीची धाटी. )

किति तरि येउं मी काकुलती ॥
उठ त्याग राग मिष पुरे पुरे ॥ किति० ॥ ध्रु० ॥
अर्ज विनंती करित केव्हांची ॥
चुंबन घेउन बोलुन चालुन ॥
हंसुन खेळुन मन खुलास सुखविलास, ॥
दे दे खरेखुरे ॥ किति तरि० ॥ १ ॥

पद १०

( राग जिल्हा; ठुंबरीची धाटी. )

टाकुन हसता प्रियकर बोला ॥
शब्द सुखाचा प्राण भुकेला ॥ ध्रु० ॥
प्रेमरसीं तव जीव लुब्धला ॥
नेत्रबाहुलीभाव रंगला ॥ टाकुन० ॥ १ ॥
धन्य भाग्य मी ह्मणुन लाभला ॥
संगम तुमचा प्राण कुडीला ॥ टाकु० ॥ २ ॥
भूषणमणि सौभाग्य-गुणाला ॥
सौख्यसिंधु तुह्मी मज सरितेला ॥ टाकु० ॥ ३ ॥

स्नेह जिव्हाळा पति जायेला ॥
   वियोग ना कधि तरु छायेला ॥ टाकु० ॥ ४ ॥

पद ११

( राग पिलू; ठुंबरीची धाटी. )

किति विनवूं किति विनवूं किति विनवूं बाई ॥
   आजि सख्या कां बोलत नाहीं ॥ ध्रु० ॥
कामातुर हे कुसुमित जाई ॥
   व्याकूल अबला जीवन देई ॥ किति० ॥ १ ॥
शरण तुह्मां शिर वाहूनि पायीं ॥
   घडिघडी काढित नाक दुराई ॥ किति० ॥ २ ॥
माफ करीं चुकी असल्यास कांहीं ॥
   नाठवि अवगुण पदरांत घेई ॥ किति० ३ ॥
आर्जववाणी स्ववसुगराई ॥
   पाहुनि पडला पंत विमोहीं ॥ किति० ॥ ४ ॥

पद १२

( राग परज सोहनी; ख्यालाची धाटी. )

नदा सदा मुदनीर वाहुंदे ॥ सरिते सह संसारसागरीं ॥ ध्रु० ॥
क्रमित आयुपथ भुवनसरायीं ॥ झालि भेट देवानुसार हे ॥ न० ॥ १ ॥
क्षणिक जीवन धन हि पराई ॥ क्रोध टाकुनी धोधि अंतरीं॥ न. ॥ २ ॥

---

## प्रकरण ५.

## सखिविनोद.

---

### आर्या.

नकळो रहस्य तिसऱ्या यास्तव सखि अन्य वस्तु आलीला ॥
वर्णुनि छेकापन्हुतिवचनें सुंदर कथी दयितलीला ॥ १ ॥

## श्लोक.

सातांसहा मासिं गृहास येतो ॥ डुले स्वतां डोलवि ही मला तो ॥
बोलावया वाटतसे हि शंका ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; पंखा ॥२॥

सदा सुखें वर्धविणार कांतिला ॥ कधीं नहो दूर चुकून दृष्टिला ॥
असे सदा कीं मम चित्तरंजन ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; अंजन ॥३

निशींत साऱ्या मज संगिं जागला ॥ प्रभात होतां मग जाउं लागला ॥
वियोग त्याचा हृदयास वेधक ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; दीपक ॥४

ये मध्यरात्री भुवनीं तयाचें ॥ सौंदर्य कोणा वदवेल साचें ॥
होतो मला त्या बघतांचि मोद ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; चांद ॥५

अहर्निशीं ये सदनीं सये तो ॥ तशांत सर्वां हि समक्ष येतो ॥
कथूं किती तत्सुखहर्षमात ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; वात ॥६॥

बाहींत बाही भिडवून दोनी ॥ उरोज दाबून धरी वरोनी ॥
हो त्रास तत्‌योग वियोगकालीं ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; चोळी ॥७

म्या रात्र सारी उरिं बागवोनी ॥ बहार त्याचा अवघा लुटोनी ॥
केलें प्रभातीं मग त्यास दूर ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; हार ॥८॥

अद्यीं पडे घट्ट गळां सुटेना ॥ डुले हि जैं तैं मजशीं हटेना ॥
उरीं न त्याचा मज होय भार ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; हार ॥९॥

आंगीं कसा गांठळ देखण्यांत ॥ रसाल हा फार चि चाखण्यांत ॥
चुंबावया पात्र चि तो सुचक्षू ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; इक्षू ॥१०

दासीं करीं म्या गृहिं आणवीलें ॥ सर्वांग त्यानें मम मर्दियेलें ॥
तत्संगमिं होय मळीन चैल ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; तैल ॥११॥

दाही दिशा त्या विण चित्त दोले ॥ पुनःपुन्हा चातक जेविं बोले ॥
येतां न तो होय अनर्थ दीर्घ ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; मघ ॥१२॥

माझ्या सवें बैसुन सर्वकाळ ॥ वदे बहु मोहक मिष्ट बोल ॥
रातोत्पलाक्षें तनु शामवर्णा ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; मैना ॥१३॥

चांचल्य देहीं अति रम्य कांती ॥ विलोकितां नेत्र दिपोनि जाती ॥
तद्वाग्विनोदें मज ये न नीज ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; वीज ॥ १४
भेटे मला येउन शीत काळीं ॥ निशीं न सोडी मग ही सकाळीं ॥
वर्णूं किती तें सुख गे विशाल ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; शाल ॥ १५॥
बांधा कसा सुंदर गोल नामी ॥ रूपास त्याच्या बहु भाळलें मी ॥
शोभे गुणीं शोभवि रम्य कांती ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; माती ॥ १६
पोषाग नामी हिरवा अमोल ॥ सदा विराजे मुख लाल गोल ॥
कंठी नवी कंठि कशी वहावा ! ॥ सखे सखा कीं ? सखि नाहिं; रांवा ॥ १७

आर्या.

सुंदर मुख तेजस्वी सकल सुखांचे निधान किति वानूं ॥
दुर्दिन त्याविण गमतो सखे सखा कीं ! सखी नव्हे; भानू ॥ १८॥
निजल्यें असतां शयनीं रात्रीं अवचीत येउनी निकट ॥
चुंबन घे हळु गालीं सखे सखा कीं ! सखी नव्हे; चिलट ॥ १९॥
जागवि सर्व निशीभर पर्यंकीं त्रासवीच येऊन ॥
चपल न हातीं गवसे सखे सखा कीं ! सखी न; मत्कूण ॥ २०॥
घेउनि कटिभागावर देतां कंठास घट्ट परिरंभ ॥
बोले मंजुलवाणी सखे सखा कीं ! सखी नव्हे; कुंभ ॥ २१॥
स्पर्शें तनु रोमांचित करि थरथर अधर कडकडा खंडीं ॥
करवी सीत्कार मुखें सखे सखा कीं ! सखी नव्हे; थंडी ॥ २२॥
ह्या प्रिय वसंतकाळीं व्याकुल त्याविण जीव मम भारी ॥
घडिघडि गमे वरातें सखे सखा कीं ! सखी नव्हे वारी ॥ २३॥
रिझवी रमवी शमवी रूपस्पर्शोपभोग गुण यांणीं ॥
रुचिर गमे मज भुवनीं सखे सखा कीं ! सखी नव्हे; पाणी ॥ २४॥
झाला प्रथमचि संगम घाबरला जीव घाम डवडवून ॥
आंगावर चिर भिजले सखे सखा कीं ! सखी नव्हे ऊन ॥ २५॥

गुणगणवर्णालंकृत मंजुल रसभरित बोल हर्षविता ॥
रिझवी पदोपदीं मन सखे सखा कीं! सखी नव्हे; कविता ॥२६॥
मंजुल सुस्वर वाणी ऐकुन मद्बुद्धि तद्गुणीं मुरली ॥
सत्यचि सुवंशसंभव सखे सखा कीं! सखी नव्हे; मुरली ॥२७॥

---

श्रीमद्गुणविभवालंकरण द्युमणिप्रभाव युवराज ॥
होलकरेंद्र शिवाजीराव महाभागधेय नरराज ॥२८॥
यांच्या सेवेशीं हें प्रेमालापाख्य काव्य अल्पतर ॥
सेव्योपकृतिस्मृतिपर सेवक विनयादरें करीं नजर ॥२९॥

---

डिसेंबर सन १८८२ इसवी.

# नागपंचमी.

## उपोद्घात.

### आर्या

श्रावण मासीं पहिल्या पक्षीं ये पंचमी तिला ह्मणती ॥
सण नागपंचमीचा कारण नागास त्या दिनीं पुजिती ॥ १ ॥
प्रत्यक्ष नाग कोणी पूजिति कोणी करून मातीचे ॥
कोणी पत्रीं चित्रीं लिहुन हुबेहूब कृष्ण शाईचे ॥ २ ॥
हळदीचीं गंधाचीं रंगाचीं वक्र वक्र अंगाचीं ॥
चित्रें सुंदर लिहिती भिंतीवर मिश्र नवभुजंगाचीं ॥ ३ ॥
गारुडि पोटासाठीं दऱ्या वनांतून नाग पकडून ॥
मोठ्या मोठ्या शहरीं येति तयां पूजनास घेऊन ॥ ४ ॥

### साक्या

मळकट भगवे जाडे भरडे घालुनिया पोषाग ॥
कावड झोळी यांच्या मध्यें ठेविति सुंदर नाग ॥ ५ ॥
कितीक खांद्या वरती लोंबत टाकिति माळाकार ॥
कितीक धरती करीं ज्यांत ते करिती वळवळ फार ॥ ६ ॥
" दूध पिलाओ नागोबाकूं " " दूध पिलाओ कोही " ॥
ऐसें वारंवार पुकारित फिरती घरघर कांहीं ॥ ७ ॥
रस्त्या मध्यें उतरुन झोळी करंडींतिल सापास ॥
उठउन बसता करिती दर्शन लोकांना करण्यास ॥ ८ ॥
कोणी पुंगी मंजुल सुस्वर वाजविती तोंडानें
ऐकुन तो ध्वनि फणी फणा मग काढुन डोलवि माने ॥ ९ ॥
नादलुब्ध अहिफणे पुढें मग गारूडी स्वकराला ॥
शिवडमरू परि हालवुनीया खेळविती बहु त्याला ॥ १० ॥

भुजंग मग तो खवळुन जोरें फूत्कारे टाकीत ॥
विघ्न-करा त्या करास चावूं पाहे तो रागांत ॥ ११ ॥

श्लोक

गारुडी धरुनिया अहिला असे ॥ हिंडती चहुंकडे बहु लालसें ॥
पुंगि वाजविति ते मधुर स्वरी ॥ लुब्ध होति च भुजंगम जी वरी ॥ १२॥

आर्या

घेऊन पंचपाळी युवती हस्तांत हळदकुंकाचीं ॥
भावें पूजा करण्या येती बाहेर नागनाथाची ॥ १३ ॥
पूजा करून मग पय ओतिति वाटींत नागदेवास ॥
पाजाया, ज्याचा त्या स्वार्थी गारुडि मात्र दे वास ॥ १४ ॥
किंतिक फुटाणे लाह्या वाहुन जोडून हस्त वर त्यांस ॥
मागति सौभाग्यवती वाढो आयुष्य सुचिर वरत्यांस ॥ १५ ॥
दिंडे खीर वगैरे पक्कान्नें करुन ज्यांस जी विहित ॥
जेविति अत्यानंदें इष्ट सखे आप्त सोयऱ्यांसहित ॥ १६ ॥
भोजन झाल्या वर मग मिळुनी आपापसांत किति रमण्या ॥
तिसरे प्रहरा नंतर जाती बागांत वारुळें पुजण्या ॥ १७ ॥

## ना ग पं च मी.

श्लोक

उरकुनि गृहकृत्यें सर्व ही आपुलालीं ॥
जमुनि कितिक एके ठायिं हो एक कालीं ॥
करिति बहुत गोष्टी कामिनी आपसांत ॥
सुरस मधुर गाणीं गाति कित्येक त्यांत ॥ १८ ॥

गीत

प्रीति रीतिच्या मंजुल वाणी ॥ गोष्टि परस्पर बोलति कोणी ॥
आनंदाच्या केवळ खाणी ॥ सुंदरि त्या प्रेमें ॥ १९॥
सासुसासरे जावा नणदा ॥ गांजिति बहुविध करिती निंदा ॥
ह्मणुनी विस्मय पावुन खेदा ॥ गाऱ्हाणी करिती ॥ २०॥
चोळी पातळ शालू लुगडीं ॥ डाग-डागिने बाळीबुगडी ॥
ह्यांचि भाषणें शौकि फांकडी ॥ बोलति त्या कोणी ॥ २१॥
धांवा गोपुर हरिचेंडुफळी ॥ फुगडी गौळण अशोक चोळी ॥
रास नाच बन वेणू मुरली ॥ न्हाणवली पिंगा ॥ २२ ॥
आदिकरुन हीं अनंत गाणीं ॥ विविध परींचीं सुस्वर वाणी ॥
गाती हर्षे मिळुन मैत्रिणी ॥ रंगेल्या बऱ्या ॥ २३ ॥
कोणि सुंदरा बोले सखिला ॥ काल पासुनी कांहीं मजला ॥
नाहिं ग मेलें सुचत स्वारिला ॥ जायाचें बाई ॥ २४ ॥

पद २५.

( राग जिल्हा; टुंबरीची धाटी. )

कसं करूं प्रियकर जाती दुरी
सोडुनि मजला घरीं ॥ कसें करूं ॥ ध्रु० ॥
आज्ञा अशी मज कळल्या पासुनि ॥
जाणों त्दृदयीं ग सलते सुरी ॥ कसें० ॥ १ ॥
समजूत घालुनि थकल्यें परोपरी ॥

काहिं नुमजे ग भरले भरीं ॥ कसें० ॥ २ ॥
दुःख हें जिवींचें सांगूं कोणा मा ॥
खातें विष द्या ग कोणी तरी ॥ कसें० ॥ ३ ॥
नवसाशीं तुळशी मात तूं पावें ॥
व्हावें रहाणें ग ऐसें करीं ॥ कसें० ॥ ४ ॥

**आर्या.**

नंतर सस्मित उत्तर प्रेमें सखिहनु धरून बोले ती ॥
किति तरि कौतिक मेलें बाई दुनियेंत निराळि हे प्रीती ! ॥ २६ ॥

**साक्या.**

प्रतिउत्तर ते बोले सखिला सारा वेळ तुह्माला ॥
सुचते थट्टा हीच वेळ का आहे गे थट्टेला ॥ २७ ॥
चार दिसांनी सण वरुषाचा आला जवळ तशांत ॥
परीं पासुन बरें जिवाला वाटत नाहिं ज्वरांत ॥ २८ ॥

**श्लोक.**

पुसे तोंच कोणी दुजी मैत्रिणीस ॥ उगा बैसलीसे नसे चैन जीस ॥
अगे सारजे तूं अशी कां उदास ॥ बरें नाहिं कीं ! काय होतें जिवास ॥ २९
सखी बोल ऐकोनिया उत्तरातें ॥ वदे ते तिच्या हो धरोनी करातें ॥
उदासी कशाची जिवा काय होतें ॥ तुह्मी बोलता ऐकतें मी गहीं त ॥ ३०
उलट ते सखि वदे मधुभाषिणी ॥ किति तरी लपविशी मशी साजणी ॥
उतरलें मुख तुझें दिसतें मला ॥ जणुं गुलाबकळि कोमलि कोमला ॥ ३१

**आर्या.**

परिसुनि सखिवचनें हीं घाबरली कंठ दाटला ऊर ॥
धामानें डबडबली जणुं आला प्रेमसिंधुला पूर ॥ ३२ ॥
डोळे भरून आले अश्रूदक टपटपा गळे खालीं ॥
जाणों हृदयतडागीं तुंबुनि दुःखप्रवाह उडि घाली ॥ ३३ ॥
कीं वर्मपक्ष्मकर कुश अश्रूदक यांहिं त्या द्विजा मदना ॥

सुखनिद्रा संकल्पच सोडी प्रियविरहपर्वि मृगनयना ॥३४॥
वाचे शब्द फुटेना कांहिं सुचेना चुकार बहु झाली ॥
गोऱ्यामोऱ्या वदनें त्द्द्रत सखिला कशी अति बुझाली ॥३५॥

पद ३६.

( साध्या एकताली लावणीची धाटी. )

ऐक सखे साजणी ॥ सखे गे ऐक० ॥
मोहिमे ग वरती गेला मम प्राणपति दुरदेशीं टाकुनी ॥
नाहिं निद्रा लोचनीं ॥ सखे गे नाहिं० ॥
निशिदिनिं ध्यानीं मनीं आठवे ग प्रियगुणी जणुं चालक घोकणी॥
नाहिं कळत बातणी ॥ सखे गे नाहिं० ॥
जीव करी तळमळ विरहानें जळफळ जळो मोहिम वैरिणी ॥
कधिं येईल परतुनी सखे गे कधि० ॥
जिव हा गे फार श्रमी धरिं नाहीं धरध.॥ध्रु०१
हाचि समय साधुनी ॥ सखे गे हाचि० ॥
लढाई ग मजवर उभी झाली खबतर सततचि ही डांकिणी ॥
अतिरथि समरांगणीं ॥ सखे गे अतिरथि० ॥
भिडती ग रणशूर घेउनियां करीं शिर दयामाया सोडुनी ॥
नव्हत उगा बोलणीं ॥ सखे गे नव्हत० ॥
सदा हाण मार भर दम नसे क्षण भर चकमक झडतें रणीं ॥
सांगु किती काहणी ॥ सखे गे सांगु० ॥
आलि नागपंचमी जीव हा ग फार श्रमी धरिं नाहीं धरधनी॥२॥
घरघरच्या कामिनी ॥ सखे ग घरघर० ॥
परोपरी वसनें लेउनी ग भूषणें जाति वारुळपूजनीं ॥
प्रेमभरें निजमनीं ॥ सखे ग प्रेमभरें० ॥
आवडीनें मुखावह वागुनिया प्रियासह रमति चपल नागिणी ॥
मी च कशी पापिणी ॥ सखे ग मीच० ॥

काय करूं ते ग नग पतिविण तगमग रवि वांचुनि पद्मिणी ॥
कोणि सांगा जाउनी ॥ सखे ग कोणि० ॥
आलि नागपंचमी जीव हा ग फार श्रमी घरिं नाहीं घरधनी ॥२
पाव कुलस्वामिणी ॥ सखे ग पाव कु० ॥
दया कर मजवर येणें व्हावें लवकर जय पावुनियां रणीं ॥
जोड हिरा कोंदणीं ॥ सखे ग जोड हि० ॥
चुडा तुझा घडविन ओहोरानें चढविन शिर वाहिन चरणीं ॥
हीं च असे मागणी ॥ सखे ग हीं च० ॥
जीव करी हुरहुर किती तरी धरूं धीर कधिं लोळेन चरणीं ॥
पंतकृत गायनीं ॥ सखे ग पंत० ॥
आलि नागपचमी जीव हा ग फार श्रमी घरिं नाहिं घरधनी ॥४॥

**आर्या**

कोणी सुंदर तरुणी नारी निज मंदिरीं उभी द्वारीं ॥
पाहुनि खिन्न विलोला सोंची स्वांतांत पांथ शेजारी ॥ ३७ ॥

पद ३८.

( राग सोहनी; ख्यालाची धाटी )

सुंदर ही अशि नार फांकडी ॥
कोण कुणाची मदनलालडी ॥ ध्रु० ॥
गौरवर्ण तनु सुवक्र साजिरी ॥
धुंद नयन गजगामि गोजिरी ॥ सुंदर० ॥ १ ॥
हस्यवदन मृदु गाल तिलांकित ॥
लाल अधर रदराजि राजित ॥ सुंदर० ॥ २ ॥
उंच छाति भर ज्वानि नवतिची ॥
दिव्य कांति छवि चंद्रजोतिची ॥ सुंदर० ॥ ३ ॥
नितंब पृथु कटि सिंह समा ती ॥
थाट घाट अति रम्य आकृति ॥ सुंदर० ॥ ४ ॥

फकड अकडबाज रंगेली ॥
पाहि पंत मुखि घालि अंगुली ॥ सुंदर० ॥ ५ ॥

पद ३९.

( राग जिल्हा; ठुंबरीची धाटी. )

रतिरसभरिता ही हरिणाक्षी ॥
द्वारिं उभी कां काय निरीक्षी ॥ ध्रु० ॥
पदर क्षणोक्षण पीन स्तनावर ॥
चाळविते पर मन हि अनावर ॥ रतिरस० ॥ १ ॥
चिंतातुर अति चकित अंतरीं ॥
घटित मनोगत घोळित अधरीं ॥ रतिरस० ॥ २ ॥
मग्ध अधोमख गाल मृदुकरीं ॥
क्षिति पदनखरीं ॥ रतिरस० ॥ ३ ॥
वदता हळु सखि विनादवचनें ॥
गोष्ट पतीची मुरडि लोचनें ॥ रतिरस० ॥ ४ ॥
मैनेप्रति दीनोक्ति सुंदरी ॥
वदत विफल तारुण्य पंजरीं ॥ रतिरस० ॥ ५ ॥
सन्मुख तरुवर विहगविहारा ॥
पाहुनि पावत स्फुरणविकारा ॥ रतिरस० ॥ ६ ॥
तापद प्रियपतिविरह असावा ॥
वा हिज सम पति योग्य नसावा ॥ रतिरस० ॥ ७ ॥
हिणवर बिजवर युवतिलक्षणा ॥
बघुन खिन्न मनीं पंत पाहुणा ॥ रतिरस० ॥ ८ ॥

पद ४०.

( राग जिल्हा; ठुंबरीची धाटी. )

पाहुं नको मुख लपित साजणी ॥
दुष्ट राहुपरदृष्टि पापिणी ॥ ध्रु० ॥
वेळ असे ही सखु गुजरीची ॥
नजर न लागो तुज बिसनीची ॥ पाहुं नको० ॥ १ ॥
गजमुक्ता गिरिकंदरिं धुंडिति ॥
वीर न ते तुज काय लुब्धती ॥ पाहुं नको० ॥ २ ॥
सती द्रौपदी सीता अहल्या ॥
व्यसनीं लावण्यें च गुंतल्या ॥ पाहुं नको० ॥ ३ ॥
वदत पंत विधि पुनरपि ढाळिल ॥
रूप असें तरि रम्य न होइल ॥ पाहुं नको० ॥ ४ ॥

---

श्लोक.

येणार हो सण पुढें अहिपंचमीचा ॥
आधींच तो प्रियजनां टकळा प्रियांचा ॥
लागे सदा सुवसनाभरणें नवीन ॥
आह्माप्रती सरस घेउनि द्या ह्मणून ॥ ॥ ४१ ॥

आर्या.

रिझवुनिया हसुनीया किंवा ऐशाचि अन्यविध लीला ॥
करुनी मागति मागणि एकांतीं या कितीक सुपतीला ॥ ४२ ॥

श्लोक.

आली वार्षिक नागपंचमि सख्या आता पुढें दो दिशीं ॥
धंदा खच्चित घ्यालना पण तरी सांगा खरें हो मशीं ॥
शालू लाल कुसुंबि दोडमजली किंवा तशी पैठणी ॥
पर्वी दाखविण्यास आणविलि जो होती हिरा बैंगणी ॥ ४३

आणखी पतिस ती मग बोलली ॥
लाडकी मृदु वचें बहु चांगली ॥

कंचुकी चवकडी निळि मंदिली ॥
पाहिजे प्रियकरा मजला दिली ॥ ४४ ॥

दुजी प्रियतमा प्रिया सुरस भाषणीं वीनवी ॥
मला जडित चांगली ठुशि करुन द्यावी नवी ॥
किती दिवस जाहले मज करुन ती देतसा ॥
मनोरथ न सिद्ध हो कपिगृहानुवादे तसा ॥ ४५ ॥

कोणि कामिना रंग माहलीं ॥ एकटी बसे खिन्न जाहली ॥
बोलते मनीं स्वारि आज कां ॥ येइना गडे तोंच ये सखा ॥४६॥
कांतमूर्ति ते नयनि पाहिली ॥ सत्वरी उभी उठुन राहिली ॥
मस्तकीं करें पदर सांवरी ॥ लाजली मनीं बहुत बावरी ॥ ४७ ॥
देउनी विडा पतिस मुर्कुनी ॥ मंचका वरी हळुच बैसुनी ॥
गोष्टि आदरें बहुत बोलते ॥ देति हर्ष त्या मधुर बोल ते ॥४८॥
मंजुभाषणीं रिझवुनी पती ॥ प्रेमसागरीं उभय डोलती ॥
हात जोडुनी विनविले सती ॥ चंद्रहार द्या ह्मणुन त्यास ती ॥४९॥

पद ५०.

( राग काफी जिल्हा; ठुंबरीची धाटी. )

घडवा चंद्रहार ॥ हार सख्या, घडवा चंद्रहार ॥
आहे फार मनि हौस प्राणपति ॥ घडवा० ॥ धृ० ॥
कनक कोंदणीं पाच हिरे मणि ॥
विमल अमोल मिळवा जडवा ॥ घडवा० ॥ १ ॥
रत्नजडित अति सुबक पदक सह ॥
सरस पदर करवा भरवा ॥ घडवा० ॥ २ ॥
नागपंचमी सण वरुषाचा ॥
येत अतां परवां बरवा ॥ घडवा० ॥ ३ ॥
प्राणपती शिरताज आज ही ॥
हौस माझि पुरवा तुरवा ॥ घडवा० ॥ ४ ॥

श्लोक

दर्बारीं उरकूनि काज अवघें आला पती हो घरीं ॥
तों कोठें रमणी दिसे न ह्मणुनी गेला च अंतःपुरीं ॥
तेथें ती श्रमखेदतापहरिणी चंद्रानना गोजिरी ॥
अस्ताव्यस्त समस्त भूषणहिना पाहीं अती घाबरी ॥ ५१ ॥

बोले सुशब्द मृदु मंजुलसे बहूत ॥
प्रेमें स्वबाहूंस पुढें करुनी हि कांत ॥
देई न ती पण मिसें प्रतिउत्तराला ॥
लोळे मिटून नयनें धरणीतलाला ॥ ५२ ॥

रागें दिसे अरुण शंनिभ राग कर्णी ॥
नासाग्र ही सरळ सुंदर त्याच वर्णी ॥
रक्तोत्पलें च नयनें फिरवी गरारा ॥
बिंबोष्ट कोमल बहू हलवी थरारा ॥ ५३ ॥

दासीकडे पति वळून पुसे " सखीला ॥
हें काय! आज कुठलें! सुचलें कशाला! " ॥
सस्मीत ती पदर सारुन त्यास बोले ॥
" कांहीं न कांहिं असतें च उगाच मेलें! " ॥ ५४ ॥

रुष्टा प्रिया ती निरखूनियां पती ॥
घेऊन अंकीं धरुनी हनुप्रती ॥
बोले तिला " सांग महान कोणतें " ॥
" झालें तुला दुःख चि आज घोळतें " ॥ ५५ ॥

तुझें कांहीं बाहीं फुरगुट असें नित्य असतें ॥
जिवा भीती माझ्या उगिच न तुला योग्य दिसतें ॥
वृथा कष्टी होशी अनुकुल असोनी हि सगळें ॥
किती त्यां बोलावें, जिवलग सखे, गे तुज खुळे ॥ ५६ ॥

कंचुकी चवकडी निळि मंदिली ॥
पाहिजे प्रियकरा मजला दिली ॥ ४४ ॥
दुजी प्रियतमा प्रिया सुरस भाषणीं वीनवी ॥
मला जडित चांगली ठुशि करुन द्यावी नवी ॥
किती दिवस जाहले मज करुन ती देतसा ॥
मनोरथ न सिद्ध हो कपिगृहानुवादें तसा ॥ ४५ ॥
कोणि कामिना रंग माहलीं ॥ एकटी बसे खिन्न जाहली ॥
बोलते मनीं स्वारि आज कां ॥ येइना गडे तोंच ये सखा ॥४६॥
कांतमूर्ति ते नयनिं पाहिली ॥ सत्वरी उभी उठुन राहिली ॥
मस्तकीं करें पदर सांवरी ॥ लाजली मनीं बहुत बावरी ॥ ४७ ॥
देउनी विडा पतिस मुकुनी ॥ मंचका वरी हळुच बैसुनी ॥
गोष्टि आदरें बहुत बोलते ॥ देति हर्ष त्या मधुर बोल ते ॥४८॥
मंजुभाषणीं रिझवुनी पती ॥ प्रेमसागरीं उभय डोलती ॥
हात जोडुनी विनविते सती ॥ चंद्रहार द्या ह्मणुन त्यास ती ॥४९॥

पद ५०.

( राग काफी जिल्हा; ठुंबरीची धाटी. )

घडवा चंद्रहार ॥ हार सख्या, घडवा चंद्रहार ॥
आहे फार मनिं हौस प्राणपति ॥ घडवा० ॥ ध्रु० ॥
कनक कोंदणीं पाच हिरे मणि ॥
विमल अमोल मिळवा जडवा ॥ घडवा० ॥ १ ॥
रत्नजडित अति सुबक पदक सह ॥
सरस पदर करवा भरवा ॥ घडवा० ॥ २ ॥
नागपंचमी सण वहर्षाचा ॥
येत अतां परवां वरवा ॥ घडवा० ॥ ३ ॥
प्राणपती शिरताज आज ही ॥
हौस माझि पुरवा तुरवा ॥ घडवा० ॥ ४ ॥

श्लोक

दर्बारीं उरकूनि काज अवघें आला पती हो घरीं ॥
तों कोठें रमणी दिसे न म्हणुनी गेला च अंतःपुरीं ॥
तेथें ती श्रमखेदतापहरिणी चंद्रानना गोजिरी ॥
अस्ताव्यस्त समस्त भूषणहिना पाही अती घाबरी ॥ ५१ ॥

बोले सुशब्द मृदु मंजुलसे बहूत ॥
प्रेमें स्वबाहुंस पुढें करुनी हि कांत ॥
देई न ती पण मिसें प्रतिउत्तराला ॥
लोळे मिटून नयनें धरणीतलाला ॥ ५२ ॥

रागें दिसे अरुण संनिभ राग कर्णीं ॥
नासाग्र ही सरळ सुंदर त्याच वर्णीं ॥
रातोत्पलें च नयनें फिरवी गरारा ॥
बिंबोष्ट कोमल बहू हलवी थरारा ॥ ५३ ॥

दासीकडे पति वळून पुसे "सखीला ॥
हें काय? आज कुठलें! सुचलें कशाला?" ॥
सस्मीत ती पदर राहुन त्यास बोले ॥
"कांहीं न कांहिं असतें च उगाच मेलें!" ॥ ५४ ॥

रुष्टा प्रिया ती निरखूनियां पती ॥
घेऊन अंकीं धरुनी हनुप्रती ॥
बोले तिला "सांग महान कोणतें" ॥
"झालें तुला दुःख चि आज घोळतें" ॥ ५५ ॥

तुझें कांहीं बांहीं फुरगुट असें नित्य असतें ॥
जिवा भीती माझ्या उगिच न तुला योग्य दिसतें ॥
वृथा कष्टी होशी अनुकुल असोनी हि सगळें ॥
किती त्यां बोलावें, जिवलग सखे, गे तुज खुळे ॥ ५६ ॥

देऊनि ती पतिकरा हिसका बजागी ॥
मांडीवरूनि पडली मग भूमिभागीं ॥
बाष्पें बहू खळखळां नयनीं वहाती ॥
गालीं सकज्जल चकाकत शोभताती ॥ ५७ ॥
होऊनि खिन्न मग तो पति मानसांत ॥
जाऊनि मंचकिं जरा पहुडे निवांत ॥
नाहीं परंतु ह्रदयीं स्थिरता ह्मणून ॥
लोळे परस्पर कुशीस कुशी वरून ॥ ५८ ॥
पुनरपी झट दिशीं वर ऊठला ॥
दृढ विचार मनिं घोळित बैसला ॥
फिरवुनी तिजकडे मग दृष्टिला ॥
सुरस मंजुल पदीं वदतो तिला ॥ ५९ ॥

पद ६०.

( राग भैरवी अथवा कालिंगडा )

प्राण सखे रुसशी ॥ कां मम प्राणसखे रुसशी ॥ ध्रु० ॥
सुरस विलासी प्रेमयुक्त ते ॥ बोल न तूं वदशी ॥ कां० ॥ १ ॥
शरच्चंद्रिके सम मम ह्रदया ॥ तोषक ना हसशी ॥ कां० ॥ २ ॥
विशाल काळे चंचल डोळे ॥ मोडुनिया बघशी ॥ कां० ॥ ३ ॥
कोमल पाणी-हार न टाकिशी ॥ कंठीं आज कशी ॥ कां० ॥४॥
पाहुनि मजला लाजुनि सन्मुख ॥ राहणें उभें त्यजशी ॥ कां० ॥५॥
तव मधुराधरसुधारसाचा ॥ लाभ न तू देशी ॥ कां० ॥ ६ ॥
कुसुम सेव्य जी सुतनु लतिका ॥ धरणितलीं धरशी ॥ कां०॥७॥
करितां हळु तुज स्पर्श करानें ॥ नागिण फणफणशी ॥ कां०॥८॥
नवनीताहुनि मृदुतर मन तें ॥ कठिण वळें करिशी ॥ कां० ॥ ९ ॥
स्वामिण पांचा प्राणांची मम ॥ जीवित तूं असशी ॥ कां०॥१०॥

कांहिं वांकुडें पाउल माझें ॥ नसुनि उगा जळशी ॥ कां० ॥११॥
तुजविण मजला चैन पडे ना ॥ जाति पळें युगशीं॥ कां० ॥१२॥
जीव अती मम व्याकुल होतो ॥ ओढुनि किति धरशी ॥कां० ॥१३॥
काय चुकी मज पासुनि झाली ॥ कोप असा करिशी॥ कां० ॥१४॥
प्रेमाचा मनिं सुटतां पाझर ॥ दाटुनि आंवरिशी ॥ कां०॥ १५ ॥
काय वेड तुज भरलें असे हें ॥ आज मला छळिशी ॥ कां० ॥ १६॥
अंत नको बघुं माझा आतां ॥ मार मिठी मजशीं ॥ कां० ॥१७॥
पंत ह्मणे प्रिय सुंदरिला गे ॥ तोंचिव प्रिय मनसीं ॥ कां०॥१८॥

साक्या.

परिसुनि पतिचीं वचनें हीं मग उडघुनि वर मानेला ॥
फुंदत फुंदत डोळे चोळित बोले राजसबाळा ॥ ६१ ॥
" उगाच मेलें खुशामतीचें बोलायाला काय ? ॥
शिव शिव देवा व्यर्थ! बिचाऱ्या अबला ह्मणजे गाय ॥ ६२ ॥
कांहिं जरासें हवें लागल्या मुखांकडे पुरुषांच्या ॥
पहावयाचें पडतें; देवा, धिक जिण्या अबलांच्या ॥ ६३ ॥
धन्य विधात्या तव करणी ही निर्मुनि त्वां उभयांला ॥
आह्मांस च कीं पराधीनता लागे भोगायाला" ॥ ६४ ॥

श्लोक.

परिसुनि वचनें हीं कांत बोले प्रियेला ॥
किति तरि अबलांना लागतें भोगण्याला ॥
गडबड धरणीला लोळुनीयां पडावें ॥
" शिव शिव! अबला! " हें बोलुनीया रुसावें ॥ ६५॥

साकया.

ठीक चि आहे रुसणें वदणें आणि लोळणें मात्र
झट्ट निघालें पुढें आमुचें त्यास चि आह्मी पात्र ॥ ६६ ॥

गेल्या वर्षा पासुन ह्मणत्यें परंतु त्याचें कांहीं ॥
गावीं सुद्धा नाहीं पण हें कोणि ह्मणावें बाई ॥ ६७ ॥
"पेंडें पेंडें" करितां थकल्यें काय चोज बोलाची ॥
आणि कितीदां विशाद मेली हजारबाराशांची ॥ ६८ ॥
आतां दों दिवसांनीं जाणें पडेल चार जणींत ॥
तेव्हां त्यांनीं हिणवावें तें सोसणें चि नशिबांत ॥ ६९ ॥

श्लोक.

अहाहा वेडे गे नकळतपणें आज इतुके ॥
तुवां केले बाळे श्रम उगिच हे व्यर्थ कुतुके ॥
पहा हा आधीं तूं उघडुनि डबा लौकर कसा ॥
सखे त्या पेंड्याचा तुजहुनि असे पाड कितिसा ॥ ७० ॥

ऐकतांचि सखि हें मनिं लाजली ॥ सांवरी पदर सस्मित ऊठली ॥
बाजुला मुरडुनी उघडी डबा ॥ चंद्रिका च झळके वदनप्रभा ॥ ७१ ॥

खांद्यावरी हळुच टाकुनि वाम-पाणी ॥
आलिंगुनी पति पुशी सखिनेत्रपाणी ॥
घेऊनि चुंबन वदे मग शांतवाणी ॥
झालें तुझ्याचि मनिचें तरि सौख्यखाणी! ॥ ७२ ॥

---

आर्या.

सारुनि लगबगीनें गृहकृत्यें सर्व कामिनी रमण्या ॥
वेणिफणीभूषादिक करिती श्रृंगार वारुळां जाण्या ॥ ७३ ॥

श्लोक.

नेसूनि शालु लुगडीं नव रंगरंगी ॥
लेऊनि बाळि बुगडी नग सर्व अंगीं ॥
श्रृंगारथाट अवघा नटुनी मृगाक्षी ॥
मार्गीं जणों झुकत चालति हंस पक्षी ॥ ७४ ॥

पद ७५.

( साध्या एकताली लावणीची धाटी. )

कामिनी हंसगामिनी कि सौदामिनी चमकती व्योमीं ॥
सखिवृंद जाति वारुळा गात आरामीं ॥ ध्रु० ॥
लावुनी उटण न्हाउनी केंस उदवुनी गुंफुनी वेणी ॥
मुद चंद्रकोर केवडा फुलांची श्रेणी ॥
मुरडुनी मस्तकीं वेणी नागिणीवाणी खोंवुनी बुचडा ॥
उजु भांग शुभ्र शोभतो चंद्रमा मुखडा ॥
कज्जलें नयनमंडलें कीं नीलोत्पलें भासती फुललीं ॥
स्मरचाप निपट फांकड्या भोंवया खालीं ॥
साजिरी कपाळीं चिरी तिलक पिंजरी रेखुनी नामी ॥
सखिवृंद जाति वारुळा गात आरामीं ॥ कामिनी० ॥१॥
नेसुनी शालु बैंगणी कांचि पैठणी मिराणी सुरळी ॥
मुगि गुंजि बेलि रुइफुली अंजिरी खवली ॥
कंचुकी बहुत नेटकी लेउनी निकी फुटाणी पिवळी ॥
जरिकांठि मंदिली निळी बसंती ढवळी ॥
सांवरुन मस्तकावरुन पदर करिं धरुन चालतां झोंकें ॥
स्मरध्वजा गोल नारळी पाठिवर फडके ॥
क्षितितलीं पंकजावली मृदुल पाउलीं उमटल्या दामी ॥
सखिवृंद जाति वारुळा गात आरामीं ॥ कामिनी० ॥२॥
कोंदणीं जोडिले मणी मौक्तिकें गुणीं झळकती कंठीं ॥
ठुशि चंद्रहार तन्मणी पोत सरि पेटी ॥
नासिकीं चौकडी टिक्की साधि मौक्तिकी मोरणी नथणी ॥
बाळि बुगडि काप भोंकरें घालुनी श्रवणीं ॥
त्रिलवरी चुडे सोनेरी गोजिऱ्या करीं विलसती लसण्या ॥
जवे छंद गोठ पाटल्या कि तोडे कंगण्या ॥

सांखळ्या जोडवीं जुळ्या गेंद मासोळ्या रवति पदपद्मीं ॥
सखिवृंद जाति वारुळा गात आरामीं ॥ कामिनी० ॥३॥
हीं झुंड पाहुनी बंड शहरचे गुंड कैक अलबेले ॥
जणु प्रफुल्लाब्जपथसरीं भृंगचय तुटले ॥
श्रृंगार थाट अनिवार नटुनि सजदार फांकडे फिरती ॥
किति हयां वाग देति ते थयथया उडती ॥
निरखुनी त्यांत देखणी चटकचांदिणी कोणि स्मित करितीं ॥
भिडतांच चौनिगा चंद्रकांतसे द्रवती ॥
श्रीरंगपदाब्जीं दंग पंतकविभृंग गुंजतो रामीं ॥
सखिवृंद जाति वारुळा गात आरामीं ॥ कामिनी० ॥ ४ ॥

पद ७६.

( राग जिल्हा; ठुंबरीची धाटी. )

कोणि सुंदरी मदनमंजरी ॥ चालालि उपवनकेलिविहारीं ॥ ध्रु० ॥
नटुनि थटुनि अति वसनाभरणीं ॥ सखिसह बोलत मंजुलवाणी ॥१॥
धरुनि करीं कर जिवलग सखिचा ॥ गात मधुर मृदु सवन पिकाचा ॥२॥
फुलें चमेली बकुल मालती ॥ शिरासिं गुंफिलीं गळत खालती ॥३॥
चंचल चपला कनकवल्लरी ॥ नाजुक मृदु तनु सुबक गोजिरी ॥४॥
दयित विलोकुनि मुदित अंतरीं ॥ सस्मित मुरकुनि पदर सांवरी ॥५॥
प्रथम चि संगम वनक्रीडेचा ॥ चकित मृगाक्षी भाव व्रिडेचा ॥६॥
पाहुनि पंचायुध हो अंकित ॥ त्या कुचलकुचीं हार विराजित ॥७॥
श्रमजलकणपुलकांकितशरिरा ॥ मंदगती घन जघन रुचिरा ॥ ८ ॥

श्लोक

मार्ग हो नगरिचे अवघे असे ॥ दाटले जणु धरा फुलली दिसे ॥
चालतां तऱ्हतऱ्हा करिती किती ॥ पाहतां सकल त्या मन वेधिती ॥७७

हळुच हळुच ठेवी मेदिनीं पादपद्में ॥
वळुन पुढति मागें पाहते लोल छद्में ॥
पदर शिरसि वारंवार साशंक सारी ॥
चमकति नग रत्नें मौक्तिकें तेजधारी ॥ ७८ ॥

पोपळी चवकडी हिरवी नवी ॥
नेसली करिं मिऱ्या धरि चाळवी ॥
पाउलें गजगतीसम टाकिते ॥
पद्मराग महिला जणु जोडिते ॥ ७९ ॥

पृष्ठभागिं कटिच्या वर खोंविला ॥
कच्छ, कांठ जरिचा अति शोभला ॥
भासतो अहिच कीं चढला वरी ॥
वेणिचा धरुनि मत्सर अंतरीं ॥ ८० ॥

शालुचा पदर तो उजवी कडे ॥
शेवटीं धरि करें पवनें उडे ॥
हालतां पदर वाटतसे मना ॥
वावडी उडविते मदनांगना ॥ ८१ ॥

भोंवई चढवुनी वर वांकडी ॥
पाहते नजर चोरुनि फांकडी ॥
बोलतां मुरकुनी स्मितभाव ते ॥
लावि अंचल मुखीं रति भावते ॥ ८२ ॥

रसरशीत भर यौवन ओतलें ॥
जणु वसंत ऋतुनें वन शोभलें ॥
तनु सुवर्ण लतिकेवर कोंवळे ॥
कुच घनोन्नत वर्तुल कीं कळे ॥ ८३ ॥

घडिघडी उघडी स्तन झांकिते ॥ थबकुनीं पदिं जोडवि सारिते ॥
लवुनि वाम करें धरि पासवा ॥ नयनिं खेळविते शर पांचवा ॥ ८४ ॥

तिलक भांग सुवेणि नगांसह ॥ मुखशशी फुलवी सरसीरुह ॥
अधर विद्रुम नासिक हालवी ॥ सहनथे मदनास चि जागवी ॥ ८५ ॥
नासिकीं नथ करें सरसाविते ॥ लालडीरुचि मुखावर फांकते ॥
गालिं तों विलसतो हिरवा, अहा ! ॥ गोंदला तिळ शशीवर अंक हा ८६
गळसरी करअंगुलिनें गळां ॥ फिरविते करिते ठुशि वेगळा ॥
नजर वांकडि सस्मित बोलते ॥ वदनिची रदपंक्ति विराजते ॥ ८७ ॥
बांगड्या बिलवरी बहु चांगल्या ॥ दाटल्या मणगटीं वर पाटल्या ॥
अंगुली हनुशिरावर ठेविली ॥ पोवळ्या सम नखीं रुचि फांकली ॥ ८८ ॥

आकर्ण त्या भ्रकुटिमन्मथकार्मुकाला ॥
जोडून तीव्र अति चंचल दकूशराला ॥
लक्षून हाणि ह्रदयीं मृग कामुकांच्या ॥
लीला अशा सहज कीं घडती स्त्रियांच्या ॥ ८९ ॥

पद ९०.

( साध्या एकताली; लावणीची धाटी. )

कोणि छबकडी अजब सुंदरा पुतळी मदनाची ॥
गमे उतरली चुकुनि अप्सरा सुरपतिसदनाची ॥ धृ० ॥
सकुमार अति लावण्य कर्णिका शोभे तनु गोरी ॥
मणिमौक्तिकी नगें विराजित चमके घननौरी ॥
जरीकांठी दिडमजला शालू पिंवळा कटिं कसला ॥
धहनि निऱ्या चालतां नितंबा वर पलव तुकला ॥
मत्तमतंगिशी जपुन टाकिते हळुहळु पद तोरें ॥
मदनझलरी वाजति पैंजण छुमछुम झणकारें ॥
जोड तोड रेखिले अटकर ठेवण शरिराची ॥
भरनवती मुसमुशी टपकते रति तारुण्याची ॥ को० ॥ १ ॥
विमलेंदुशरत्प्रभा फांकली सुंदर वदनाची ॥
शाम कुरळ कच कबरि मस्तकीं फणछबि भुजगाची ॥

मृदुलोष्ठ बिंबफळें नासिका ऋजु चंपककलिका ॥
कुंदकळ्या रदपंक्ति विलसते घन हनु हरितिलका ॥
गाल गुलाबी फुलें टवटवित नाजुक दरदरले ॥
घर्ममधू जर्यी चुंबुं श्रुतीहुनि अलकाली सुटले ॥
चंचल मीन चि रम्य लोचनें जणुं मृगबाळांचीं ॥
सहज फेंकितां विलोल दकूशर गठडी प्राणाची ॥ २ ॥

श्लोक.

थाटें अशा सर्व मिळूनि नारी ॥ गाणीं शिरा मंजुल गात भारी ॥
त्या चालल्या हो किति रम्य धाटीं ॥ देखावया लोटलि लोकदाटी ॥ ९१ ॥

पद ९२.

( राग सारंग; एक ताली. )

थाटमाट करुनी बहु हे ॥ लोटले लोट लोकांचे ॥ धु० ॥
पोषाग भरजरी नामी ॥ लेउनी उंच मोलाचे ॥
केशरी कुसुंबी प्याजी ॥ नानाविध नव रंगांचे ॥
मस्तकीं फांकड्या पगड्या ॥ मंदील गोल पदराचे ॥
चाल ॥ किति समले लोंबति खालीं ॥
आंगा वर शेले शाली ॥ अति सुरेख तिलक कपाळीं ॥
केशरी लाल गंधाचे ॥ थाटमाट करुनी० ॥ १ ॥
चौकडे कानि भिकबाळ्या ॥ फांकलें तेज मोत्यांचें ॥
गोफ हार कंठे कंठीं ॥ शोभती दिव्य रत्नांचे ॥
मणियुक्त मणगटीं पोंच्या ॥ कडितोडे किति सोन्याचे ॥
चाल ॥ तरतरे पाच लालाच्या ॥
आंगठ्या बोटिं जडिताच्या ॥ करिं गेंद छड्या सुमनाच्या ॥
घमघमती वास तयांचे ॥ थाटमाट करु० ॥ २ ॥
शृंगारुनि उमदे घोडे ॥ फांकडे स्वार अलबेले ॥
लंगुरी चौखुरी तुर्की ॥ चालिनीं उडविते झाले ॥

चालतां वायुवेगानें ॥ हयपायिं वाजती वाळे ॥
चाल ॥ दाविती लगामें एडे ॥
हालती तुरे शिरिं गोंडे ॥ किति करीं चमकती खांडे ॥
जणुं वीर शिपाइ बाण्याचे ॥ थाटमाट क० ॥ ३ ॥
किति रथी सारथी सजदार ॥ घडघडां पळति रंगेले ॥
धांवती शिपायी प्यादे ॥ गजबजोनि रस्ते गेले ॥
गर्दी हे एक चि झाली ॥ पाहतां दंग मन डाळे ॥
चाल ॥ चहुंकडे थवे मौजेचे ॥
हे तमासबीन जनांचे ॥ पाहण्या इंदुवदनांचे ॥
क्रीडोत्सव विविध परींचे ॥ थाटमाट क० ॥ ४ ॥

**आर्या**

या परि नरनारीव्रज मौजेनें येति रम्य आरामीं ॥
ज्याची सुघटित रचना पाहुनि मन डोलतें चि आरामीं ॥ ९३ ॥

**श्लोक**

बागांत ह्या विलसती बहु वृक्षवेली ॥
पुष्पें फळें अमित ज्यां लगटूनि गेलीं ॥
नाना परी निरखितां मनिं हर्ष होतो ॥
वर्णावयास कविचा किति पाड हो तो ॥ ९४ ॥

कोठें रामफळी बदाम बकुळी सीताफळी जांभळी ॥
निंबोण्या खिरण्या खजूरि कंवठी दाळिंबिच्या आवळी ॥
छायेनें घनदाट शोभति किती पुष्पें फळें वाकती ॥
द्याया मान च कीं जणों सखिजनां पक्षीमुखें बोलती ॥ ९५ ॥
पानें कोमल रम्य गार हिरवीं तीं शालुशेले च कीं ॥
मेघाचे जलबिंदु लोंबति तयां त्या झालरी मौक्तिकी ॥
मेंदीच्या घनदाट सुंदर अशा ताट्या अहा शोभती ॥
दाऊं मार्ग सर्वांस त्या जणु उभ्या दोहींकडे भासती ॥ ९६ ॥

अश्वत्थ उंबर जटी वट नागचाफे ॥
आंबे अशोक सुरु चंदन सोनचाफे ॥
पेरू लकोट कवले तुति आंवळीच्या ॥
श्रेणी बहू विलसती रमणीय साच्या ॥ ९७ ॥

नारिंगि लिंबी किति जागजागीं ॥ भारें फळांच्या नत भूमिभागीं ॥
लाजूनि खालीं जणुं पाहताती ॥ पाहूनि नारीस्तनरम्यता ती ॥९८॥
उंच नारळी सरळ पोफळी ॥ रम्य वायुनें गगनमंडळीं ॥
डोलती जणों मुदित होउनी ॥ दिव्य कामिनीव्रज विलोकुनी ॥९९॥

वेली उफाट फुटल्या किति कुंज जाळ्या ॥
व्याल्या फुलून जणु त्या शिरिं पुष्पजाळ्या ॥
किंवा सजूनि बहुवर्ण सुमांबरांनीं ॥
क्रीडावया सखिजनांसह सिद्ध रानीं ॥ १०० ॥
जाईजुई फुलमयी किति पारिजातीं ॥
वेष्टूनि त्यांस जणुं त्या परिरंभ देती ॥
झाला विरूनि सुमनें अति पेर खालीं ॥
क्रीडेंत पुष्प रचना जणुं ते निघाली ॥ १०१ ॥

रंभा अहा! नाजुक रम्य खांब ॥ पानें किती कोमल रुंद लांब ॥
मोने बुडीं दाट लहान थोर ॥ शोभे जणों लेंकुरवाळि नार ॥१०२॥
व्याल्या किती केळफुलें निघालीं ॥ भारें चि तीं लोंबति थोर खालीं ॥
येती फण्या घोंस भरींव होती ॥ कोठें पहा जून पिकूं पहाती ॥१०३

**आर्या.**

रंभारंभा सुंदर आरामीं सुरतरूंत ह्या कालीं ॥
फलपुष्पवती लाजुनि पलवि जणुं मान घालती खालीं ॥ १०४ ॥

**साकी.**

लाल बसंती पिवळीं ढवळीं फुलें फुलुनि गुलबास ॥
शोभति सुंदर एक हारिनें बागाच्या कुपणास ॥ १०५ ॥

## श्लोक.

शोभे कसें तें बन केतकीचें ॥ जें कीं अहींचें स्थल मोहनींचें ॥
धो धो नदी त्या जवळूनि वाहे ॥ नागीण वासें जणुं लुब्धली हे ॥१०६

वर्तूल दीर्घ चतुस्र परोपरांचे ॥
तख्ते अनंत रचिले विविधाकृतींचे ॥
वाटा मधून असती फिरण्यास त्यांच्या ॥
दूर्वा विराजति किनारिस दाट ज्यांच्या ॥ १०७ ॥

काळीं निळीं सुकुसुमें बहु रंगरंगी ॥
तख्त्या मधून फुललीं किति जागजागीं ॥
हे गालिचे पसरिले जणुं बूटदार ॥
क्रीडाजनांस बसण्यास चि रम्य फार ॥ १०८ ॥

तगर नादवटी बटमोगरा ॥ मदनबाण सुकांचन धोतरा ॥
विकसुनी निशिगंध सुगंध हा ॥ परिमळे दवणा मरवा अहा! ॥१०९

गुलाबाचे तख्ते विकसित फुलें रम्य दिसती ॥
सुवासानें त्यांच्या सकल नरनारी विलुभती ॥
किती पुष्पें प्रेमें धरिति शिरिं तोडूनि बरवीं ॥
किती हातीं घेती निरखिति किती सुंदर छवी ॥११०॥

द्राक्षी मधूमाधवि शुभ्र जाती ॥ विस्तारुनी मंडप शोभताती ॥
खालीं अहा! पुष्करणी वहाते ॥ मासे कसे खेळति तें पहा ते ॥ १११

## दिंड्या.

मध्यभागीं बागांत हौद थोर ॥
गोल कमलाकृति, ज्यांत उंच फार ॥
रम्य कारंजे उडतसे हजारा ॥
शुभ्र मोत्यें जणु स्वच्छ बिंदुधारा ॥ ११२ ॥

श्लोक.

येऊनि ह्या उपवनीं रमण्या अनेक ॥
गाती किती सुरस बोलति एकमेक ॥
क्रीडा परोपरि किती करितां विचित्र ॥
ज्या पाहण्या जनसमूह तटस्थ चित्र ॥ ११३ ॥

उभ्या ठायीं ठायीं जमुनि युवती ही नगरिच्या ॥
पुजा नारळाची करुनि हरि देवा विवरिंच्या ॥
मनोभावें ध्याती करिति कर जोडूनि विनती ॥
" दिनानाथा देई वर रुचिर नांदोत सुपती ॥ ११४ ॥

" तुझ्या कन्या आह्मी प्रभु सदय तूं तात अमुचा ॥
" चुडा जन्मोजन्मीं कर दृढ अखंडीत पतिचा ॥
" चिरायू मांगल्यप्रद विमल सौभाग्यमणि ते ॥
" सुखी ठेवीं देवा विपुल उपभोगांत रमते " ॥ ११५ ॥

किती एकीमेकीं कर मृदुल गोरे चिमुकले ॥
बिलोरी सोनेरी मणिमय चुडे ज्यांत रुपले ॥
धरोनीया गाणीं वदत वदनीं सुस्वर पहा ॥
महोत्साहें फेरे लवत फिरतां वर्तुळ अहा ॥ ११६ ॥

मालाकार परस्परें कर करीं घालोनि चंद्रानना ॥
फेरे वर्तुळ दीर्घ दीर्घ फिरती बागांत त्या अंगना ॥
दावी फार तमासबीन जमुनी शाली तयां भोंवतीं ॥
आनंदें जन एक दृष्टि करुनी त्यांच्या कडे पाहती ॥ ११७॥

कोणी सन्मुखशा परस्पर उभ्या राहोनिया विभ्रमें ॥
दोघी दोघि मिळोनि हात धरुनी सव्यापसव्य क्रमें ॥
पायीं पाय जुळूनि ओढ फुगड्या चक्राकृती घालती ॥
पृष्टीं पल्लव नारळी जणु तनुस्पर्शें बहू डोलती ॥ ११८॥

वृक्षांच्या अति उंच उंच अडल्या शाखांप्रती बांधिले ॥
रस्से खंबिर लांब लांब बरवे खालीं कसे लोंबले ॥
खोंवोनी पदरांस कच्छ कसुनी दोऱ्या धरोनी करीं ॥
नारी सन्मुख एकमेकिं बसुनी घेती झुले त्यांवरी ॥ ११९॥

रोंवूनि जाड सरलोन्नत दोन खांब ॥
त्यांच्या वरी तुळइ आडवि थोर लांब ॥
आहे जिला जडविला हलग्यांत दोला ॥
नारी बसूनि किति त्यावरि घेति झोला ॥ १२०॥

दोले जरी झरझरां वर खालिं जाती ॥
नारी विशंक तरि त्यांवरि बैसताती ॥
सोडोनि दोर हि उभ्या किति राहताती ॥
टाळ्या किती पिटिति त्या किति गाणिं गाती ॥ १२१॥

झुले घेतां घेतां पदर लुगड्याचा अउसता ॥
सुटोनी जोरानें फडफड उडे पाठिवरता ॥
मनाला भासे तो ध्वज सुमशराचा भरजरी ॥
जणों क्रीडा वायू सह घन नितंबावर करी ॥ १२२ ॥

कोणी झोंका घेतसे उंच फार ॥ एकाएकीं तो तुटे मुक्तहार ॥
मोत्यांचा ही खालिं सर्वत्र पेर ॥ वेंचाया तीं धावती सान थोर॥ १२३

झरारां वेगानें चढवुनि झुला उंच गगनीं ॥
किती झोंके घेती स्वन मधुर गाईत वदनीं ॥
चढा ओढीनें त्या झुलत असतां शीघ्र चपला ॥
महद्रामी दोला अवचित कडाडोनि तुटला॥ १२४॥

चेंडू परी क्षितितलीं सकुमार बाला ॥
दोला तुटोनि पडणार चि तों तयांला ॥
धावूनि कोणि वरच्यावर सांवरीती ॥
त्याही सलज्जमुख सस्मित पाहताती ॥ १२५ ॥

सोडूनि दोला उतरूनि खालीं ॥
कोणी पती पाहुनि दूर झाली ॥
कोणी निढावी नगकेशवेणी ॥
पुष्पें शिरींचीं ढळलेलि कोणी ॥ १२६ ॥
कोणी प्रियाच्या धरिते कराला ॥
जेवी लता मॉधवि ते रसाला ॥
स्पर्शे कराच्या प्रिय मानसांत ॥
धन्यत्व मानी पहिल्या रसांत ॥ १२७ ॥
कोणी शिरीं पदर सारि पुढें करानें ॥
चोरूनि दृष्टि दयिताप्रति आदरानें ॥
पाहूं करी मिस सखीशि " सखी समोर ॥
वृक्षीं पहा " ह्मणुनि दाखवि तीस मोर ॥ १२८ ॥
कोणी प्रियास टक लावुनि दूर पाही ॥
प्रेमें चकोरि जणुं ते विधुतें विमोही ॥
तोही तिला निरखि तोंच तशाच रीती ॥
तो दृष्टिसंगमसुधारस दोन्हि पीती ॥ १२९ ॥
सासू कांत नणंद आदिकरुनी गेहास गेल्यावरी ॥
क्रोधें बोलुनि गांजितील ह्मणुनी कित्येक हो अंतरीं ॥
होवोनी अति घाबऱ्या लगबगां चोहींकडे धुंडिती ॥
दागीने तनुमुक्त बाळि बुगड्या चारींत जे लोपती ॥ १३० ॥
बागांत कामिनि असा करिती विहार ॥
नाना परी नयन तोषवि ती बहार ॥
रंगांत ये अजब हा रमणीय खेळ ॥
पर्ज्यन्य तों नभिं भरे घनदाट नीळ ॥ १३१ ॥
वारा सुटे थोर तशांत भारी ॥ झाडेंझुडें हालति रम्य सारीं ॥
व्योमीं घना पाहुनि मानसांत ॥ होऊनि त्या घाबरि कांपतात ॥ १३२

[क्रमशः]

अंधार कोंदाटुनिया सभोंती ॥ दाही दिशा धुंद भरोनि जाती ॥
होवोनि नीलांबर मेघमाला ॥ झांकी जणों राहुच त्या स्थलाला॥ १३३
विजा लखलखां बहू चमकती ॥ क्षणोक्षणिं जनांस त्या दिपविती ॥
घनासह नभोंगणांत फिरती ॥ जणों पतिसवें प्रिया विहरती ॥ १३४
धडधडां गगनीं घन गाजती ॥ चहुंकडे जणु दुंदुभि वाजती ॥
झरझरां गज वाजिच धांवती ॥ थडकली कलिची विनि भावती ॥ १३५

**गीत.**

छटा छावतां पर्जन्याची ॥ प्रभा लोपली नभिं सूर्याची ॥
क्रीडोत्सुकजनहृदयाब्जांची ॥ प्रसन्नता गुरली ॥ १३६ ॥
बारिक बारिक बिंदु जलाचे ॥ वर्षु लागतां व्रज अबलांचे ॥
विखरुं पाहती बोलति वाचे ॥ देवा हें काय! ॥ १३७ ॥
घनराजाची ही दरकरणी ॥ पाहुनि दिलगिर अंतःकरणीं ॥
सुंदरि झाल्या बापुडवाणी ॥ टकमक त्या बघती ॥ १३८ ॥
काळ्या पिवळ्या लाल झकाकी ॥ छत्र्या सुंदर एकाएकीं ॥
उघडुनि धरिती लोक मस्तकीं ॥ शोभा बहु साजे ॥ १३९ ॥
क्रीडा सोडुनि आतां सारी ॥ परतुनि जावें सदनीं लौकरी ॥
ऐसें आणुनि सर्व अंतरीं ॥ कुजबुजती भारी ॥ १४० ॥
जगदीशाची अगाध लीला ॥ चमत्कार अति विचित्र झाला ॥
अकस्मात तो वायु उलटला ॥ जोरानें घन उडवी ॥ १४१ ॥

**श्लोक.**

मेघावली सर्व उडोनि गेली ॥ निरभ्रता शीघ्र नभास आली ॥
बागांत सर्वत्र विकास पावे ॥ आल्हाद तो अंबुजमित्रभावें ॥ १४२॥
आनंद जो हा सकळांस झाला ॥ शके न वर्णू कवि तल्लवाला ॥
हर्षे सख्यांनीं मग चालु केली ॥ फिरुनि ती पूर्व अपूर्व केली॥१४३॥

## आर्या.

श्रीमंत राजनीतिज्ञानविशारद सुविद्य गुणवंत ॥
चतुरस्त्र दीर्घयत्नी लोकप्रिय राजमान्य विख्यात ॥ १४४ ॥
मंत्रीकार्यधुरंधर होळकरांचे प्रधान हितकारी ॥
देशप्रजाभिमानी सत्पक्षी दीनबंधुकैवारी ॥ १४५ ॥
बहुमान राजपदवी राव तिच्या रामचंद्रराव पुढें ॥
नाम असें प्रमुख असुनि भाऊसाहेब जाणविले प्रौढें ॥ १४६ ॥
कीं रावमाणिकद्वय युतसोज्वल रामचंद्र मध्य हिरा ॥
भाऊसाहेब जडित कोंदण, हे नाममुद्रिका रुचिरा ॥ १४७ ॥
अतुल स्वराजनिष्ठा स्वाश्रितलोकाभिमानबुद्धि सदा ॥
अत्युत्कट अभिलाषा स्वदेशभाग्योन्नतिप्रदा सुखदा ॥ १४८ ॥
इत्याद्यनेक अनुपम गुण ज्यांचे श्लाघ्य आणि मजवरती ॥
उपकार थोर असती नाथकृपा ती प्रशस्त गावि किती! ॥१४९॥
त्या स्वामीसेवेशीं लघु कृति हे "नागपंचमी" नांवें ॥
अत्यंत नम्र सेवक समर्पितों अति कृतज्ञता भावें ॥ १५० ॥



# छत्री.

## दिंड्या.

सुखद होळकरी राज्य माळव्यांत ॥
राजधानी इंदूर शहर त्यांत ॥
एक दिवशीं मी सहज माघमासीं ॥
जात होतों बाहेर फिरायासी ॥ १ ॥

समय संध्याकाळचा प्राप्त झाला ॥
सूर्य जाताहे परत निज गृहाला ॥
वळुनि मागें जणुं पाहुनी नभाला ॥
विविध रंगानें शोभविता झाला ॥ २ ॥

सूर्यकिरणांची झुळुक मंद पीत ॥
दिसे प्रासादीं रम्य बहू शीत ॥
जणों त्याच्यावर कांचनी मुलामा ॥
देउनीया रवि चालला स्वधामा ॥ ३ ॥

राजवाडा मजबूत कडेकोट ॥
जणों किल्ला चौबुर्जि भुईकोट ॥
अश्व हिसती किति झुलति करी द्वारीं ॥
सिद्ध जिलबीचे दिसत मौज भारी ॥ ४ ॥

दिंडिदरवाजा उंच कमानीचा ॥
वेलबूटांच्या दगडि नक्षीचा ॥
त्याजवरच्या माडींत सुस्वरांत ॥
झडत राहे चौघडा मंगलांत ॥ ५ ॥

मधुर मंजुल आलाप रुचिर गानीं ॥
उंच सनईची तान येत कानीं ॥

चोप डंक्यावर पडे दणाणा ते ॥
तिनीसांजा कल्याण वेळ होते ॥ ६ ॥
भेरिनादें आनंद सुचवि मात ॥
ऋद्धिसिद्धी माहेर हें खचीत ॥
गच्चि मजल्यावर सातव्या निशाण ॥
झुले पवनें जणु डोलवीत मान ॥ ७ ॥
राजवाड्याच्या पुढें अंगणांत ॥
स्वार घोड्यांना कैक फेरतात ॥
उभा राहोनी फरा पलटणीचा ॥
देत तंबुर सह बिगुल सलामीचा ॥ ८ ॥
वेळ होतां हे रम्य गुजरीची ॥
कामकाजें उरकूनि जन दिसाचीं ॥
घरीं वळती विश्रांत व्हावयाला ॥
तसे पक्षी ही वृक्षविरामाला ॥ ९ ॥
निळे पिवळे पोषाग लाल रंगी ॥
विविध परिचे लेऊनी लोक अंगीं ॥
राजमार्गानें बहुत येति जाती ॥
देत दाटी आनंद लोचनां ती ॥ १० ॥
काय गर्दी सर्वत्र थोर घाई ॥
फिरति लगबगिनें लोक ठायिंठायीं ॥
हत्ति घोडे रथ वाहनीं बसोनी ॥
किती पायीं चालती पथ भरोनी ॥ ११ ॥
दोन्हि बाजूला शोभती दुकानें ॥
ज्यांत जिनसा बहु मांडिल्या क्रमानें ॥
उंच माड्या रंगीत वेलपानें ॥
सुबक खिडक्या झळकती तावदानें ॥ १२ ॥

राजमार्गीं या कांहिं पुढें जातां ॥
दिसे सुंदर मैदान सांज होतां ॥
येथ अंमळ विश्रांत होउनीया ॥
स्वस्थ चोंहिंकडे लागलों पहाया ॥ १३ ॥

आर्या.

नगराच्या पूर्वेला मैदानीं ह्या नदीतटीं छत्री ॥
श्रीमन्मासाबांची ज्या जनदुःखातपास कीं छत्री ॥१४॥

साक्या.

छत्रिजवळ ह्या उभें राहुनी अवलोकितां सभोंतीं ॥
मौजेची स्थलशोभा सुंदर दिसले मन मोही ती ॥१५॥
ख्याता नामक नदी विराजे सुंदर उत्तरगामी ॥
झुळझुळ वाहे उदक ओघ लघु पात्र अरुंद हि नामी ॥१६॥
चोंहिंकडे घनदाट पसरलीं झाडें गर्द जयांत ॥
कोठें कोठें घरें मंदिरें बरवीं बहु दिसतात ॥ १७ ॥
त्यांत बुळ्यांच्या छत्रीचें वर उंच शिखर डोकावी ॥
तेथें जवळचि विद्यालय हीं प्रभव आपुला दावी ॥ १८ ॥
रम्य कमानी दगडि पुलाच्या वरुन रस्ता गेला ॥
जातां येतां नरनारींनीं दिसतो गजबजलेला ॥ १९ ॥

आर्या.

उल्लंघूनि नदीला जाण्याला पूल काय छानीचा ॥
हा भव्य बांधिलासे सुंदर दगडी नऊ कमानीचा ॥२०॥
मध्यें दोन समोरासमोर टोंकांस चार चारिकडे ॥
मुद्रित शीलांसह ते सेतूच्या दोन्हि बाजुला कठडे ॥२१॥
संस्कृत इंग्लिश फारसि हिंदि महाराष्ट्र पांच भाषांत ॥
कोरुनि शिलांवरी त्या केलें आहे प्रसिद्ध लोकांत ॥२२॥

सारांश लेखनाचा पांचि शिलांवरिल सर्व एक असे ॥
अनंत दृष्ट्या बघती प्रभुला तरि तो समग्र एक तसें ॥२३॥

**ओंव्या.**

" महा विख्यात थोर शूर ॥ यशवंतराव होळकर ॥
" ह्यांची कन्या गुणमंदीर ॥ बुळ्यां घरीं नांदली ॥ २४ ॥
" त्या भिमाबाईचे चिरंजीव ॥ आप्पा साहेब चिमाजीराव ॥
" यानीं गाजविलें आपुलें नांव ॥ धर्मार्थ पूल बांधोनी ॥२५॥
" प्रस्तुत राज्यकर्ते धुरंधर ॥ महाराज सरकार बहादुर ॥
" तुकोजीराव होळकर ॥ साहेब हमिल्टन रसिदंट ॥ २६ ॥
" या उभयतांचे कारकीर्दीत ॥ काम झालें हें नामांकित ॥
" दुवा देती जातयेत ॥ सर्व लोक त्रिवर्गी ॥ २७ ॥
" सन अठराशें एकूणचाळिसांत ॥ संमत एकूणीसशें पांचांत ॥
" फसली बाराशें पासष्टांत ॥ कामा आरंभ झाला ह्या " ॥२८॥
अशा अर्थाचा हा मजकुर ॥ लिहून सुवाच्य अक्षर ॥
पूर्वोक्त पांची शीलांवर ॥ कोरूनि प्रसिद्ध केलासे ॥ २९ ॥

**साक्या.**

पुलाजवळ ह्या बसति भिकारी अंध पंगु ह्मातारे ॥
परोपरी अति दीनवाणिनें ह्मणती " दया करारे " ॥ ३० ॥
कोणि फांकडे शौकी बिसनी तीतर चंडोलांचे ॥
करीं पिंजरे घेउनि फिरती ऐकत बोल तयांचे ॥ ३१ ॥
मैदानीं बाजार भरे ह्या नित्य भाजिपाल्याचा ॥
पुतळा विलसे मध्यभागिं रशिदंट टोपिवाल्याचा ॥ ३२ ॥
हुबेहूब हा सुंदर पुतळा पाहुनि भास मनास ॥
होय सजीवचि हा जणु थकित अवलोकुनि नगरास ॥३३॥
बाजाराचा थाट लागला गिऱ्हाइकांची दाटी ॥
देववेविचा किलकिलाट बहु भीड जाहली मोठी ॥३४॥

पद ३५.

( राग सारंग साध्या एकताली लावणीची धाटी. )

छत्रि सभोंती विस्तीर्ण जागा मैदानाची त्यांत अहा! ॥
नित्य प्रभाता पासुन होतो क्रयविक्रय तो थाट पहा ॥ ध्रु० ॥
ताजा कवळा भाजीपाला यावर पाणी शिंपोनी ॥
हाऱ्यामधुन किति जुडक्या बांधुन विकिति माळिणी बैसोनी ॥
खिरे कांकड्या वांगी भेंड्या कृष्णभोपळे आणि आळीं ॥
शेपू कोत्री ओल्या मिरच्या आलें कोथिंबिर केळीं ॥
मुळे चाकवत अळूं आरवी लसूण कांदे केळफुलें ॥
वाटाण्याच्या शेंगा हिरव्या चुका चण्याचे किति सोले ॥
दुकानाच्या हारि लागल्या ओस्यावरुनी चौंहिकडे ॥
सुरम्य शोभा पाहुनियां ही मानस हर्षामाजि बुडे ॥ छत्रि० ॥ १ ॥
कोठें पेरू बोरें कंवठें लिंबें नारिंगें कवले ॥
नानाविध बहु रंगबरंगी चित्रविचित्रें कैक फळें ॥
छबड्यांतुन हें भरुन माळवें बाजूवरता ह्मातारा ॥
चौरंगावर बसुनि एका तोलुनि देतो तो दुसरा ॥
भाव पुसे त्या " केसा दिया ये बैंगण छोटा और रहा " ॥
नार्दी मग त्या चुकवुनि डोळा नेतो कोणी सुरण पहा ॥
उभयतां चि मग मारामारी हमरातुमरी शिविगाळी ॥
चालु झाली कैक तमाशा जमूनि पाहति भोंताली ॥ छत्रि० ॥ २ ॥
इतक्यामध्यें कोणि शिपाई रंगित दंडा करिं धरुनी ॥
येउन तेथें दोघांला ही पकडुनि बोले गुरकउनी ॥
" चलो चबुत्रेपर तुम दोनों बहोत शेखिमें आये हो " ॥
" हमेष ऐसे झगडे! क्यंव रे! किस्कि हिमायत भुले हो " ॥
ऐसें धमकावितां तयानें करिति विनवण्या परोपरी ॥
कर जोडुनियां चोर साव ही ठेउनि डोकीं पायांवरी ॥

निरुपाय ते अगदीं झाले लाचारी मग पाहुनियां ॥
तर्जनि अंगुष्ठयाची होतां खूण शिपाई सोडि तया ॥ छत्रि० ॥३॥
सौम्य वासरीं प्रति आठवड्या जास्त हाट थाटे भरतो ॥
परगांवींचा कनिष्ठ उत्तम माल परोपरिचा येतो ॥
दुकानाच्या भोंती दाटी गिऱ्हाइकांचीं त्यांत शिरे ॥
थोर वशिंडी मस्त पोळ तो भिऊनि पळती त्या सारे ॥
"हैक हैक, डिर्र, हां हां हां हां, बचो बचो हो" ओरडती ॥
गर्दी एकच झाली पडतां कैक रडती आपटती ॥
सूं मुसंडी देउन त्यानें तोंड घातलें पाटिमधें ॥
सहज घडीभर भाजि उडविली काठ्या मारिति तरि न बधे ॥छ०॥४॥

## दिंड्या.

पुष्पवटिका रमणीय दक्षिणेशीं ॥
पडे दृष्टीला सहज मौज खाशी ॥
वृक्षवल्लरि बहु पुष्पपल्लवांनीं ॥
शोभताती किति मधुप त्यां वरोनी ॥ ३६ ॥
मधुन तरुल्यांच्या क्षेत्रिं फिरायास ॥
मार्ग केलेले असति चहुंकडेस ॥
त्यांत शौकी किति फिरति हवाखात ॥
मौज पाहुनि ही दंग मनीं होत ॥ ३७ ॥

## साक्या.

लाल गुलाबी शुभ्र कासनी गुलेनार किरमिजी ॥
निळीं जांभळीं पीत बसंती अशीं विविध रंगांचीं ॥ ३८ ॥
पुष्पें सुंदर विकसित होउनि शिशिरीं रानोमाळ ॥
मालव शेतां गालीच्या परि शोभविती बहुसाळ ॥ ३९ ॥
तीं अफिमीचीं लहान हिरवीं झाडें कुसुमित झालीं ॥
ज्यानीं ह्या त्यावर उडतां पतंग किति भवतालीं ॥ ४० ॥

सुमनाच्या ह्या परोपरीच्या रंगांतुनि सम रंगी ॥
लहान फुलपाखरें निराळीं ओळखण्या त्या संगीं ॥ ४१ ॥
कठीण परि तीं स्वपक्षभ्रांत्या शंकित मनिं होऊन ॥
कैसे त्यांच्यावर मधु प्याया जावें ह्मणति बसून ॥४२॥
विचार हा कीं घोळित जणुं तीं हालवीत पक्षांना ॥
पुष्पशिरांवर अधर तळपतीं हर्षविती नेत्रांना ॥ ४३ ॥

## अभंग.

रावे येउनीया शाखांवरी किती ॥ बैसोनिया जाती समरंगी ॥४४॥
माना लांबवोना दुराल सुमनें ॥ ओढिती चोंचीनें कितीएक ॥४५॥
किती एका पदीं धरोनी पुष्पातें ॥ आंतील मधूते प्राशिताती॥४६॥
चोषोनी मरंदा पुष्पें जीं टाकिलीं ॥ त्यांचा पेर खालीं झाला असे ॥४७॥
अगस्त्याचे ऐसे वृक्ष शोभताती ॥ शेंगा ही लोंबती त्यांच्यावरी ॥४८॥
किती लोक पर्ड्या घेऊनी हातांत॥फुलें वेंचितात त्यांच्याखालीं॥४९॥
मंडपावरूनी गेल्या द्राक्ष वेली ॥ फळघोंस खालीं लोंबतात ॥५०॥
कमानी मंडपी दर्वाज्याच्या वरी ॥ वेल परोपरी शोभताती ॥५१॥
ग्रीष्म ऋतुमध्यें पुष्पित होऊन ॥ सुवासा सोडुन सर्वत्र हो ॥५२॥
संतोष देणारी वेल जाइची ती ॥ मंडपा सभोंती वेढलीसे ॥५३॥
तीव्र उष्णतापें कोमेजून गेलीं ॥ नाजूक कोंवळीं पानें ज्यांचीं ॥५४॥
ऐशा कैक वेलींवर कळ्या आल्या ॥ कैक त्या फुलल्या नानारंगी॥५५॥
निळ्या आकाशांत तारा चकाकती॥तैशीं भासताती पुष्पें तीं हो॥५६॥
कोठें झाडांतून उंच वर आले ॥ सुरू फुटलेले हिरवे गार ॥५७॥
ज्यांचीं पुष्पें बाण करुनी मदन ॥ जिंकी त्रिभुवन नरनारी ॥५८॥
ऐसे आम्रवृक्ष थोर शोभताती ॥ किती मोहोरती अग्रभागीं ॥५९॥
दाळिंबिची झाडें प्रफुल्लीत झालीं ॥ भुमिला लवलीं फलभारें॥६०॥
वनश्री पाहूनी जणो तीं हांसती ॥ माणिकें शोभती बीजपंक्ती ॥६१॥
ईड पपनस लिंबी माहळुंगी ॥ सुंदर नारिंगी फळा आल्या ॥६२॥

लहान मोठालीं सुरेख वाटोळीं ॥ हिरवीं पिवळी लाल फळें ॥६३॥
झाडांच्या पल्लवीं रम्य तीं दिसती ॥ मानस वेधिती प्रेक्षकांचें ॥६४॥
बागा मध्यभागीं हऊदाचें पाणी ॥ जणों पुष्करणी स्वच्छ वाहे ॥६५॥
वाफ्यांतुनी पाट पाण्याचे वाहती ॥ त्यांतुनी पोहती पुष्पें फळें॥६६॥
खुरपीं हातांत घेवोनिया माळी ॥ पाणी आळोआळीं मोडितसे॥६७॥
जणों बाळकांच्या पोषणाची चिंता ॥ काळजी वाहतां कष्ट करी॥६८॥
मेंदी जासवंदी कण्हेरी तुळशी ॥ पाटाच्या कडेशी हारोहारीं ॥६९॥
कर्दळीचीं बेटें त्यांत जागोजागीं ॥ शेंडू बहु रंगी चोहिंकडे ॥ ७० ॥

### आर्या.

रम्यस्थलीं अशा ह्या छत्रीं हे ज्या सभाग्य राज्ञीची ॥
त्या कोण हें कळाया परिसा संक्षिप्त कुलकथा यांची ॥ ७१ ॥
श्रीमंत पेशव्यांचें प्रख्यातचि दक्षिणेंत दरबार ॥
ज्यानीं विक्रम करुनी गाजविली वैभवांत तरवार ॥ ७२ ॥
त्या ब्रह्मबादशाहिंत भीष्मद्रोणा समान सरदार ॥
होते पराक्रमी बहु शूर सरंजामि जाहगिरदार ॥ ७३ ॥
त्यांतील एक योद्धा प्रसिद्ध मल्हारराव होळकर ॥
ज्याचा विजयी भाला झाला विख्यात जिंकुनी समर ॥ ७४ ॥
हा निज वंशीं देशीं झाला उत्पन्न वीर कुलदीप ॥
मोठे प्रताप करुनी प्रकटवि निजशौर्य तेज गुण रूप ॥ ७५ ॥
संग्राम मोठमोठे केले हो पेशव्यांहि जे प्रचुर ॥
विख्यात त्यांत झाला मुत्सद्दी राजमान्य हा चतुर ॥ ७६ ॥
जो सर्व नर्मदेच्या पलिकडचा जिंकुनी मुलूख सर ॥
केला मराठिसैन्यें त्यामध्यें हाचि मुख्य अग्रसर ॥ ७७ ॥
यास्तव त्या जिंकियल्या मुलुखाचा कारभारि सरकार ॥
मल्हारराव झाला श्रीमंतांकडुन हा सुभेदार ॥ ७८ ॥
मग माळव्यांत कांहीं प्रांत जहागिर तसें सरंजामी ॥

होतां प्राप्त स्थापी हा निज संस्थान इंदुर ग्रामीं ॥ ७९ ॥
तें हें होळकरांचें इंदुर संस्थान आजपर्यंत ॥
शौर्यौदार्यबलानें गाजे त्या मालवेंद्रवंशांत ॥ ८० ॥

श्लोक.

महा योद्धा झाला प्रबल यशवंताख्य नृपती ॥
लढाया मोठाल्या लढुनि विजयख्यात जगतीं ॥
प्रकर्षप्रोत्साहें रुचिर अभिधा सार्थ जणुं ती ॥
तयाच्या राणीला सकल जन **मासाब** ह्मणती ॥ ८१ ॥

कृष्णा बाई केशरा बाइ ऐशीं ॥ होतीं नावें दोन ह्यांचीं विशेषीं ॥
कृष्णा नामा भूषवी कृष्णभक्ती ॥ कीर्तीगंधें शोभते केशरोक्ती ॥ ८२

शौर्याब्धीयशवंतरावनिता रक्षी प्रजा आदरें ॥
प्रेमा थोर मनीं धरून जननी पाळी जशीं लेंकरें ॥
गाई ब्राह्मण दीन दुर्बळ सदा सौख्यांत आनंदले ॥
होते, यास्तव योग्य नांव तिजला **मासाब** हें शोभलें॥८३॥

आर्या.

सन इसवी अठराशें एकुणपन्नास सालिं मासाब ॥
कैलासवासि झाल्या जेथें नांदे सदैव शिवसांब ॥ ८४ ॥

श्लोक.

महामारीचा हा अवचित महा कोप घडला ॥
जणो एकाएकीं दगड गगनांतूनि पडला ॥
ढगीं वा राहूच्या मुखिं विधुकला जेवि लपती ॥
तशी राज्ञी गेली सकल जन शोकें विलपती ॥ ८५ ॥
"सती गेली गेली धनिन अमुची आज्ञ सदया ॥
"अह्माला टाकोनी अमरसदना सौख्य उदया ॥
"अतां आह्मीं झालों सकल परदेशी तिजविणें ॥
"नसे आह्मां देवा जगिं अभय थारा तुजविणें ॥ ८६ ॥

" वदान्या धर्मज्ञा विविधसुखवाणी गुणवती ॥
" शिराणी राज्याची सति निजकुला भूषणवती ॥
" अहल्याबाईच्या विमल अभिधानास कृतिनें ॥
" विराजेशी होती " सकल गुण घेती सुधृतिनें ॥ ८७ ॥

**आर्या.**

कालक्षेप करावा बाईनें ह्या सदैव भजनांत ॥
श्रीराधाकृष्णाच्या आणि तसा योग्य राज्यकाजांत ॥ ८८ ॥
श्रीकृष्ण भक्तवत्सल जो वारी दाससंकटें त्याचें ॥
प्रत्यहिं दर्शन घ्यावें तोषक अब्जांस जेवि सवित्याचें ॥ ८९ ॥

**श्लोक.**

जो प्रेमें भवसिंधु पारउतरी वारी हि सर्वापदा ॥
तत्पादांबुजयुग्मदर्शन घडो नेत्रांलितें सर्वदा ॥
या साठीं नव कृष्णमंदिर असे यांनीं पहा बांधिलें ॥
वाड्यासंनिध भव्य रम्य बरवें याम्येकडे शोभलें ॥९०॥
अशा या साध्वीचें निधन परिसोनीं गतकला ॥
विमोहानें झाली रयत अवघी दुःख विकला ॥
प्रजादुःखा पेक्षां अधिकच मनीं दुःख गमलें ॥
तुकोजीरावाला अतुल जननीप्रेम तुटलें ॥ ९१ ॥

**आर्या.**

पाळूनि पुत्रधर्मा अत्यानंदें तुकोजि रावांनीं ॥
छत्री मासाबांची बांधविली; पाहि तों तिला वानीं ॥ ९२ ॥
निजमातृभक्तिदर्शक आणि स्मारक तिच्या सुनाशाचें ॥
हें काम रम्य आहे द्योतक चिरकाल हो स्वराज्याचें ॥ ९३ ॥

**दिंडी.**

भव्य छत्री अतिरम्य हे विराजे ॥
कळस सोनेरी उंच घुमट साजे ॥

सभामंडप चौकोनि पुढें आहे ॥
काम दगडाचें सर्व नामि हो हें ॥ ९४ ॥

**साक्या.**

प्रथमारंभीं साधा मजबुत पाया खोल भरोनी ॥
त्याच्या वरती जोतें रचिलें चिरेबंदि चौकोनी ॥ ९५ ॥
चारी बाजुस ह्या जोत्याच्या असती कोरियलेलीं ॥
जागोजागीं नानापरिचीं चित्रें सुंदर ठेलीं ॥ ९६ ॥
लांबरुंद ह्या उंच चबुऱ्यावरी मनोहर भव्य ॥
प्राचीमुख ही थोर इमारत असे बांधिली दिव्य ॥ ९७ ॥
इमारतीचा पुढचा अर्धा पूर्वेकडचा भाग ॥
रमणीय सभामंडप शोभे पाषाणाचा तुंग ॥ ९८ ॥
मागिल अर्ध्या भागीं नाजुक घुमट नेटका पाहा ॥
काम तयाचें निरखुन मानस होतें थक्क अहाहा! ॥ ९९ ॥
सुबक नकाशी घाट बांधणी यथायोग्य परिमाण ॥
आदिकरुन ह्या इमारतीची सुंदर रचना जाण ॥ १०० ॥
सभामंडपाची हो शोभा सुरेख किति वानावी ॥
मनुजाच्या जणुं कौशल्याची मूर्ति हे चि जाणावी ॥ १०१ ॥
मध्यभागीं तो चौरस सुंदर चौक तयाची भूमी ॥
सपाट काळ्या सुरेख घोंटिव पाषाणाची नामी ॥ १०२ ॥
सफेत संगमरवरी शोभे किनारीस संजाफ ॥
तसेंच गोलाकार मधोमध कमळ सुरंगी साफ ॥ १०३ ॥
चौकाच्या ह्या सभोंवताली असती सोपे त्यांत ॥
कारंजें एकेक विराजे सुंदर दर चष्म्यांत ॥ १०४ ॥
चौकावरती अष्टपैलु छत गुळगुळीत अति खासें ॥
कळाशिनें अति जोडुन शीला कौशल्यें केलेंसे ॥ १०५ ॥
पैलुदार ह्या गोल छताच्या किनारीस भोंताली ॥

वेलबुटी अति सुबक विराजे हुबेहूब फुललेली ॥ १०६ ॥
पाषाणांचे खांब सुशोभित वाटोळे सुरुदार ॥
भव्य उंच ज्यांवरती बहुविध कोरिव नक्षी फार ॥ १०७ ॥
खांबामध्यें तशाच कोरिव मेहरापी दगडाच्या ॥
असती ज्यांवर वेलबुट्या अति सुंदर परोपरीच्या ॥ १०८ ॥
सभामंडपावर हो साऱ्या बाजुस बाहेरून ॥
केली आहे नकशी चित्रें वेलबुट्या कोरून ॥ १०९ ॥
देव दैत्य नृप वीर पुरुष किति महा महा साधूंचीं ॥
दंती श्रृंगी नखी पशूंचीं कीर मोर पक्ष्यांचीं ॥ ११० ॥
सुरेख चित्रें आणि परोपरि वृक्षवलि गुलजार ॥
लाल कुरुंदी शीलांवरती कोरुनिया अनिवार ॥ १११ ॥
अनुक्रमें त्या कृष्ण शिलांसह घुमटाला जोडून ॥
उभ्या आडव्या रचल्या ओळी कौशल्यें खिळवून ॥ ११२ ॥
मुळापासुनी कळसा वेरीं कंगोऱ्यांच्या ओळी ॥
सरळ शोभती शिखर दिसे तें मूद जणों लांबोळी ॥ ११३ ॥
सुंदर बारिक कंगोऱ्यांचीं वलयें काळीं बाळीं ॥
खालुन वरती लाहनी लाहनी होत आडवीं गेलीं ॥ ११४ ॥
अशा तऱ्हेचें शंकाकृति हें उंच शिखर छत्रीचें ॥
सुवर्ण कळसाजवळ वायुनें झुलतें पट ध्वजाचें ॥ ११५ ॥
जणुं तें तेथुन नगरांतिल हो उंच उंच मंदीरें ॥
प्रासादादिक रम्य आणि जन बहु मार्गी फिरणारे ॥ ११६ ॥
निरखुनि सुंदर हा देखावा आणि वाद्यगजराला ॥
परिसुनिया तें तुष्ट होउनी डोलवितें मानेला ॥ ११७ ॥
पाठीमागें भिंतीमध्यें मूर्ती विघ्नेशाची ॥
शोभतसे यत्स्मरणें हरती विघ्नें सर्व जनांचीं ॥ ११८ ॥

किति पारावत जोडे सज्जावर शीतळ छायेंत ॥
माना झुकवुनि यथेच्छ नाचति किती शद्ब करितात ॥ ११९ ॥
गाभाऱ्याचा संगमरवरी सुंदर नकशीदार ॥
दरवाजा तो ज्याच्या बरच्या बाजुस मूर्ती फार ॥ १२० ॥
रम्य शोभती अनुक्रमानें त्यांत मधें गणराज ॥
कोठें धनूरक्षक वेषें गोपांसह यदुराज ॥ १२१ ॥
मुरली अधरीं करें धरोनी वाजवीत घनशाम ॥
जवळ उभा शिरिं कांबळ घेउनि गाईसह बळराम ॥ १२२ ॥
स्तब्ध धेनु जणु ऐकुनि मुरली किती चरति भोंताली ॥
वत्से त्यांचीं गुढगे टेंकुनि लुचती कांसे खालीं ॥ १२३ ॥
माना वळवुनि धेनु चाटिती वत्सांना सुखवाया ॥
किति पितरांची बाळांवर ही अपार ममतामाया ॥ १२४ ॥
दह्यादुधाचे माठ मस्तकीं घेउनि गोपी जाती ॥
मार्गीं त्यांच्या बहुविध खोड्या करितो श्रीहरि हातीं ॥ १२५ ॥
फुगड्या टिपऱ्या आदिकरोनी क्रीडा ज्यां रासाच्या ॥
खेळे यदुपति त्या गोपींसह तल्लिन अति मति ज्यांच्या ॥ १२६ ॥
मत्स्यादिक दश अवतारांच्या मूर्ति एक हारीनें ॥
अनुक्रमानें दिव्य शोभती परोपरी रंगानें ॥ १२७ ॥
गाभाऱ्याच्या पुढच्या बाजुस सभोंवार बसवील्या ॥
संगमरवरी पाषाणाच्या नाजुक सुंदर जाळ्या ॥ १२८ ॥
ह्या मखराच्या मधें भुईवर काळ्या श्वेत शिलांचा ॥
गालीचा अति सुरेख केला कोरिंव वेलबुटांचा ॥ १२९ ॥
गालीचाच्या मध्यभागीं त्या कमलाकृति हौदांत ॥
कारंजें रमणीय विराजे उंच उडे जल ज्यांत ॥ १३० ॥
कारंज्यावर वेलबुटींचें चौकोनी छत ज्यांत ॥
घांट मधोमध थोर टांगिली सांखळीस हल्कयांत ॥ १३१ ॥

दरवाज्याच्या पुढें मधोमध मखराच्या बाहेर ॥
सुंदर संगमरवरी नंदी शोभे शिवा समोर ॥ १३२ ॥

गाभाऱ्याच्या मध्यस्थानीं श्रीशिवलिंग विराजे ॥
सुरेख घोटिव संगमरवरी शाळुंकेंत असे जें ॥ १३३ ॥

श्रीशिवलिंगाजवळ पार्वती झारि करीं घेऊन ॥
अभिषेकी जणु कारंज्यानें उदक उभी राहून ॥ १३४॥

श्रीशिवसांबामागें सुंदर देव्हारा भिंतींत ॥
मूर्ति हुबेहुब मासाबांची स्थापन केली ज्यांत ॥ १३५ ॥

सुरेख पुतळी निरखुनि ही जणु भास खरोखर वाटे ॥
मासाहेबच बसल्या असती प्रेम मनीं बहु दाटे ॥ १३६ ॥

स्मरणी हातीं घेउनि जणु का नामावळि जपतात ॥
श्रीशंकर भवतारक सन्मुख ध्याउनिया ह्रदयांत ॥ १३७ ॥

---

## पद १३८.

( राग जोगी. )

प्रभाव अद्भुत थोर महा ॥ मानवज्ञानाचा ॥ ध्रु० ॥
छत्री सुंदर ही पाहून ॥ डोले मानस हर्ष भरून ॥
विचार सहज चि ये मागून ॥ धन्य निपूण नरदेहा ॥ प्र० ॥ १ ॥
बघतां पूर्वस्वरुप शिलांचें ॥ वाटे अंतर भूमिनभाचें ॥
कर्तब किति तरि कौशल्याचें ॥ वर्णन त्याचें अल्प पहा॥ प्र० ॥२॥
हुबेहुब अति चित्रविचित्रें ॥ पशुपक्ष्यांचीं सुंदर चित्रें ॥
वेलबुट्या किति सुमनें पत्रें ॥ कोरुनि यंत्रें केलिं अहा! ॥ प्र० ॥३॥
मानवकृति हे चातुर्याची ॥ ठसवी अंतरिं सृष्टिक्रमाची ॥
अपार माया जगदीशाची ॥ कर्तृत्वाची अजब रहा ॥ प्र० ॥ ४ ॥

---

## आर्या

श्रीमान् नृपकुलभूषण रूपसुलक्षण महेशभक्तगण ॥
रुचिरमनोहर भाषण सुरस सुविद्याकलागुणाभरण ॥ १३९ ॥
प्रौढप्रतापभास्कर गहनहितोद्यमविचारणागार ॥
विक्रमबलरत्नाकर सौख्यैश्वर्यप्रशास्तिगलहार ॥ १४० ॥
नीतिज्ञानविशारद राज्यधुरंधर सुधीर धरणिधर ॥
सोज्वलकीर्तिकलाधर करुणासागर वदान्यवारिधर ॥ १४१ ॥
गुणिराज राजराजेश्वर विभु राजाधिराज जगमान्य ॥
इंद्रपुरेंद्र तुकोजीराव महाराज होळकर धन्य ॥ १४२ ॥
त्या श्रीप्रभुसेवेशीं छत्री हें अल्प काव्य हा जाणा ॥
सादरविनयाज्ञांकितदासाचा पृथुकरूप नजराणा ॥ १४३ ॥

तारीख १ अक्टोबर सन १८७० इसवी.

---

# बादशाह शाहआलम याचा विलाप.

**साक्या.**

हा हा! आतां दुर्दैवाचें तुफान वादळ मोठें ॥
कोपें खवळुन मजवर भरभर चढत चाललें वाटे ॥ १ ॥
त्याचे सोसाट्याचे वारे चहूंकडुन मज भोंतीं ॥
भोंभों शब्दें घोर गर्जुनी प्रळय थोर सुचवीती ॥ २ ॥
अर्ताच नुकता झळकत होता जो माझ्या सत्तेचा ॥
प्रभाव इतका सोज्वल कीं जणु गगनीं रविप्रभेचा ॥ ३ ॥
सांप्रत तो अति खेद निराशा यांच्या भरलहरांत ॥
वाहत वाहत ऱ्हास पावतो निशिच्या गाढ तमांत ॥ ४ ॥
अंध जाहलों नागविलों ची ऐहिक सर्व सुखाला ॥
आतां शोकें ग्रासुन सजलों बळि मी दुःखमखाला ॥ ५ ॥
प्रदेश खासा सुरम्य विस्तृत जो हिंदुस्थानाचा ॥
तेथें झाला श्रेयस्कर मम अरुणोदय राज्याचा ॥ ६ ॥
शीघ्र चि परि तें उत्कर्षाचें दर्शन मायावी कीं ॥
लोपुनि आतां दुःखाचें हें कफन शुभ्र शिर झांकी ॥ ७ ॥
ईश्वरि नेमानेम टाळण्या कोण शक्त हो प्राणी ॥
थोर महात्मे सत्वधीर ही पडले भक्षस्थानीं ॥ ८ ॥
स्वामि खरोखर जो मक्केचा मुख्य इमामहुसेन ॥
त्याच्या मरणापूर्वी आलें परिसा केवि घडोन ॥ ९ ॥
अधर्मसमरानल चेतविला भडका चोंहिकडोनी ॥
धर्मद्वेष्ट्या दुष्ट जनांनीं नीति मार्ग सोडोनी ॥ १० ॥
जेव्हां स्वर्गी चढूं लागला पवित्र आत्मा त्याचा ॥
तेव्हां गगनीं भेदुनि गेला विलाप अपशकुनाचा ॥ ११ ॥

नभोमंडळीं अपयशसूचक खळीं पडुन तें सारें ॥
दिसूं लागलें दुश्चिन्हांनीं विचित्र काळेंबेरें ॥ १२ ॥
आणि भयंकर मोठे मोठे निष्प्रभ उल्कापात ॥
होउं लागले खळबळलेल्या धुंद अंतरिक्षांत ॥ १३ ॥
अशा सकल ह्या अशुभांवरुनी काफर एझिद याच्या ॥
धर्मद्रोही घातपातकी हाडवैर खुनसाच्या ॥ १४ ॥
दुष्कृत्यांनीं पुण्यशील अति साधु इमामहुसेन ॥
याचा हो परिणाम काय तें आलें स्पष्ट कळोन ॥ १५ ॥
साधु परि च त्या मी हि पदच्युत झुगारिला जाऊन ॥
स्वायत्तीकृत अखिल जगाचा बादशहा होऊन ॥ १६ ॥
अस्तु, अतां ही दारुण शिक्षा प्रभुची हिजपासून ॥
होवो तरि मत् सर्वहि दुरितें झालीं क्षांत ह्मणून ॥ १७ ॥
अंतःपुरिंच्या घमघमलेल्या रम्य लताकुंजांत ॥
क्षण हि रमाया कोठुन आतां सांपडणार सुखांत ॥ १८ ॥
मिळवुनि वाद्यें गायकमंडळ एकस्वर होऊन ॥
गाइ मनोहर मधुर स्वर ते आतां श्रवणीं कुठून ॥ १९ ॥
निर्जन कारागाराच्या ह्या भयाण चौंगिर्दींत ॥
दिवांध शोकप्रद घूत्कारीं आरडतें च निशींत ॥ २० ॥
पूर्वजविक्रमचिन्हविभूषित राजसभेंत पहातां ॥
प्रसादकांक्षी दरबारी जन जमे न कोणी आतां ॥ २१ ॥
तसेंच " जी जी " ह्मणुनी आज्ञा स्वामीची लवलाही ॥
झेलणार ते भृत्य न माझ्या हाजरींत कोणी ही ॥ २२ ॥
येथें माझ्या रडण्याचा ध्वनि दबुनि आंतच्या आंत ॥
विलय पावतो हळूहळूसा क्षीण होत जाईत ॥ २३ ॥
माझें रडणें ऐकुनि हें जणु सुस्कारे टाकीत ॥

घुमट कमानी प्रतिध्वनींनें प्रत्युत्तर देतात ॥ २४ ॥
येथें आतां जिकडे तिकडे चालतसे तोऱ्यानें ॥
मूर्तिमंत वध, आणिक संशय करितो राज्य बळानें ॥ २५ ॥
तसेंच नव नव संत्रासांनीं परिपूरित अंधार ॥
कोंदुन अगदीं उज्याड कोणाचाहि नसे संचार ॥ २६ ॥
भयाण ऐसें स्थल हें ह्याच्या योगें मर्दतरांत ॥
भलत्या भलत्या दुष्ट कल्पना नानाविध उठतात ॥ २७ ॥
बोला हो तरि बोला कोणी, ह्या भूलोकांतून ॥
धर्म ह्मणुन तो सर्व च अगदीं गेला काय उडून? ॥ २८ ॥
काय न्याय तो परत घेतला प्रभुनें बोलावून? ॥
आणि समूळचि नष्ट जाहली काय दया येथून? ॥ २९ ॥
वार्ताहर अति चपल दूत हो जा च तुह्मी लवलाहीं ॥
गगनमंडळीं उडत आपुल्या रौप्यवर्ण पक्षांहीं ॥ ३० ॥
पिटवा डांगोरा हो जगभर सर्व कुकर्माचा ह्या ॥
आणि असा हा गजब उसळला मजवर तो हि कळाया ॥ ३१ ॥
अन्याय चि हा मजविषयींचा सर्व नृपां कळवून ॥
करा तयांच्या हृदयीं जागृत राजकीय अभिमान ॥ ३२ ॥
माझा हा अपमान नव्हे तर होतो सर्व नृपांचा ॥
काय दुःख हें साहिल शांतचि तैमुर अभिमानाचा? ॥ ३३ ॥
धीरोदारमनाच्या शिंद्या त्वरा करीं रे फार ॥
पुन्हा एकदां दिल्लीवर तव तुटुन पडो दलभार ॥ ३४ ॥
काय इंग्रजी न्याय आणि तो दर्प हि इंग्रेजांचा ॥
हेस्तिंगासह गेला सोडुन तट हिंदुस्थानाचा? ॥ ३५ ॥
अतुल पूर्व त्या उपकारांची विस्मृति पडली काय? ॥
फार काय हो बादशहात चि सर्व दिलींना? हाय! ॥ ३६ ॥

विसरूनि गेले सर्व काय तें ? आठवतो तो काय ? ॥
पूर्व दिवस कीं जेव्हां येथें प्रथम ठेविला पाय ॥ ३७ ॥
पहा कसा हो प्रथम येउनी येथें ह्या लोकांनीं ॥
केला अर्ज विनम्रपणानें बोलुन केविलवाणी ॥ ३८ ॥
" हुजूर आह्मी गरिब फिरस्ते परदेशस्थ असून " ॥
" फिरत फिरत हो फार दूरच्या आलों बेटांतून " ॥ ३९ ॥
" शांतपणें व्यवहार करोनी दों पैशांची माया " ॥
" जोडुनि अपुली पुंजी कांहीं बढवावी झटुनीया " ॥ ४० ॥
" असा आमुचा हेतु असे तरि कांहिं आमुची सोय " ॥
" व्हावी " ह्मणुनी आर्जविलें तें मुळिंच विसरले काय ? ॥ ४१ ॥
धन्य ! अरे रे ! काय तरी हा कर्मगतीचा फेरा ॥
क्षणांत कांहीं क्षणांत कांहीं खेळ विचित्र चि सारा ॥ ४२ ॥
ऐहिक ह्या क्षणभंगुर नश्वर मनुजस्थितिच्या पाठीं ॥
किती लागलीं असती तरि हीं दुष्ट अरिष्टें मोठीं ॥ ४३ ॥
याच इंग्रजांवर पूर्वींचा करणारा उपकार ॥
तो च अतां मी विनम्र होउन लवतों त्यांज समोर ॥ ४४ ॥
आणि भाकितो करुणा त्यांशीं कर दुर्बल पसरून ॥
संरक्षा मज एका माझ्या कीं दासापासून ॥ ४५ ॥
संरक्षण तें काय तरी हो ? ह्मणतों मी इतकें च ॥
कीं आतां हा पुरेजाहला सर्वोपरि संकोच ॥ ४६ ॥
जेथें कोणाचा ही कांहीं उपसर्ग न लागेल ॥
आणि कधीं ही लक्ष न जिकडे कोणाचें जाईल ॥ ४७ ॥
जें कोणाला ठाउक नाहीं ऐसें स्थल एकांत ॥
अथवा लहानसें एखादें क्षुद्र झोंपडें शांत ॥ ४८ ॥
अथवा निर्जन गिरिकंदर वा गुंफा गुहा निवांत ॥
अशा ठिकाणीं मिळो बसाया दरवेशां समवेत ॥ ४९ ॥

तेथें केवळ भगवंतावर देवोनी च हवाला ॥
सर्व संग संन्यास करोनी झिजविन ह्या देहाला ॥ ५० ॥
तृणास्तीर्णशा भूमीवरती टाकुन आंग पडेन ॥
आयुष्याचे दिन उरलेले प्रभुभजनीं लोटीन ॥ ५१ ॥
उपकार चि हा मोठा मजवर केलासे समजून ॥
उदार इंग्रज लोकांना मी खचित दुवा देईन ॥ ५२ ॥
आणि निमाज हि पढतांना कीं कधीं न मी राहीन ॥
"कल्याण असो इंग्रेजांचें" असें प्रार्थिल्यावीण ॥ ५३ ॥
व्यर्थीचि ! रे ही व्यर्थ मदाशा ! चिंतार्णवांत खोल ॥
बुडून अगदीं अरण्यरोदन करित असें हें फोल ॥ ५४ ॥
कोण ऐकतो बोल तरी हे ! लांब राहिला थारा ॥
इतका रडतों परंतु नाहीं कोणि दया करणारा ॥ ५५ ॥
माझा आयुर्दीप तयांतिल शांतितैल सरल्यानें ॥
जाऊं बघतो आहे अगदीं क्षीणरूप झाल्यानें ॥ ५६ ॥
अशा अवस्थेमधें तयाला आल्हादास्पद कांहीं ॥
आश्वासनीय ऐसा अल्प हि किरण प्रकाशित नाहीं ॥ ५७ ॥
दीपाचे ह्या किरण अंतिंचे मंद फिकट होऊन ॥
व्यर्थमनोरथतम हें केवळ व्यापिलसे पसरून ॥ ५८ ॥
ये चि; भयंकर मृत्यो ये तूं; कालरूप अंधारा ॥
ये तूं; तुज मी हांक मारितों भीत नसें असुहारा ॥ ५९ ॥
मरणोत्तर हीं ऐहिक दुःखें सर्व हि होती दूर ॥
मित्र न कोणी ज्यांस इथे त्यां मिळतो तो हि सुधीर ॥ ६० ॥
पावे मरणोत्तर विश्रांती थकलेला प्राणी तो ॥
सर्व मानवी दुःखापासुन जीव विमुक्त चि होतो ॥ ६१ ॥
आतां जें हें मंगलकारक कालनिमंत्रण मातें ॥
येतें त्यासह हर्षें जाइन सोडुन ह्या लोकातें ॥ ६२ ॥

कारण मजसम मित्रशून्यसा अन्य पतित तो कोण ॥
गांजियलेला सर्व हि ऐहिक दुःखानें दडपून ॥ ६३ ॥
मृत्यूच्या त्या अलंघनीय प्रदेशभागीं कांहीं ॥
सूड उगविणाऱ्या मनुजांची गति हो पोंचत नाहीं ॥ ६४ ॥
तसेंच तेथें स्पर्धा, मत्सर, कृतघ्नता यांचा ही ॥
प्रवेश होऊं नाहीं सकत चि तिळभर सुद्धा कांहीं ॥ ६५ ॥
परस्परांना मारायास्तव उठलेले शत्रू ते ॥
निवांत निद्रा घेती स्थैर्यें विसरुनिया कलहातें ॥ ६६ ॥
कष्ट कर करुन झिजलेल्या त्या वेड्या दासांच्या हीं ॥
तुटून तेथें बंधमुक्त तो स्वतंत्रतासुख लाही ॥ ६७ ॥
त्याच त्याच हो वर स्थलीं त्या या जुलमी सत्तेला ॥
धिःकारुन मी मरतां मरतां वरिन अंत्य विजयाला ॥ ६८ ॥

---

राजमान्य राजश्रीराजित विद्यागुणमंडीत ॥
रावबहादुरपदकालंकृत सभाचतुर पंडीत ॥ ६९ ॥
नीतिज्ञानविशारद मंत्री रसज्ञ पुस्तककार ॥
जे नीलकंठ राव कीर्तने कृपाळू मजवर फार ॥ ७० ॥
वाढो विद्याकला स्वदेशीं ग्रंथ प्रसवो भाषा ॥
सदा स्वदेशोन्नति राहो हे अत्युत्कट अभिलाषा ॥ ७१ ॥
इत्यादि बहु श्लाघ्य हेतुंच्या स्मरणास्तव त्यांना हे ॥
लघुकृति अर्पण करितों स्नेहें सादरविनयोत्साहें ॥ ७२ ॥

---

तारीख ३० माहे जुलै सन १८८५ इसवी.

# कोरेगांवचे लढाई समयीं श्रीमंत बाजीराव साहेब पेशवे यांस उद्देशून

# बापू गोखले यांचें संभाषण.

आर्या.

हे भटमुकुटमणी हो बलसागर हो रणैककेसरि हो ॥
हे विजयश्रीवर हो कुलभूषण हो अनंतगुणनिधि हो ॥ १ ॥
वर्णावें थोर किती वैभव तुमचें प्रसिद्ध जाणतसा ॥
परि वाटे आज तुह्मी त्याचा अभिमान वागवा न तसा ॥ २ ॥
औदासिन्य अहो हें बरें नव्हे कीर्तिहानि जाणावी ॥
यास्तव अल्प विनंती दासाची हे मनास आणावी ॥ ३ ॥
देशस्थिति पूर्वापर तुमच्या ह्रदयांत कां न बाणावी ॥
स्वायत्तीकृत पूर्वजभाग्याला लाथ काय हाणावी ॥ ४ ॥
डंका पूर्वीं पासुन गाजत ज्यांच्या सुकीर्तिचा ऐशा ॥
रणधीर शूर योद्धे पुरुषांच्या हे पराक्रमी देशा ॥ ५ ॥
ज्या तूं स्वपृष्ठभागीं स्वतंत्रतेला खुशाल नांदविलें ॥
वात्सल्यें माहेरीं कन्येला जणु सुखांत खेळविलें ॥ ६ ॥
जो तूं थोर महात्मे पुरुषांचा शुद्ध आद्य देव्हारा ॥
तो त्या विभवाचा कां स्मशान होतोसि आज बा सारा ॥ ७ ॥
कारण तो तव पूर्वप्रभाव अद्भुत तुझ्यांतुनी आतां ॥
जाऊन नांव मात्रचि मागें राहूं पहातसे ताता ॥ ८ ॥
हें काय वाटतें तुज गोड ? अरे अधम भीरु हे नीचा ॥
ये तर पुढें जरा बघुं ! दे प्रतिवचना विचारितों त्याच्या ॥ ९ ॥
जंजीरा तो खरडा वसई बुंदेलखंड पंजाब ॥
हीं कोणतीं स्थलें ? तुज ठाउक नाहींत काय ? दे जाब ॥ १० ॥

भ्याडा बोल ! अरे तो अटकेवर कोणि लाविला झेंडा ? ॥
कोणी त्या गिलच्यांचा दर्प हरुनि निपट काढिला चेंदा! ॥ ११ ॥
त्या प्रबल रोहिल्यांची कोणी जिरवूनि टाकिली खोड ? ॥
व्याघ्रा पुढें प्रतिष्ठा किति तो मिरवील मातला खोंड ॥ १२ ॥
कोणी जर्जर करुनी नाचविलें सार्वभौम यवनांस ? ॥
पंचाक्षरी स्वमंत्रें नाचविती जणु पिशाचभवनास ॥ १३ ॥
शिंदे होळकरादी संस्थानें वाढलीं कशीं बरवीं ॥
ज्यांचा थोर दरारा केसरि पारें रिपुकरींस थरथरवी ॥ १४ ॥
डंका ज्यांच्या विजयश्रीचा सर्वत्र आज पर्यंत ॥
गाजतसे तीं सारीं स्थानें हीं काय बा तुझीं नव्हत ? ॥ १५ ॥
तव पूर्वजांत जो बहु झळकत होता प्रभाव तेजाचा ॥
लोपूनि काय तो तूं संप्रति बुरखा चि घेशि लाजेचा ॥ १६ ॥
धैर्य धरुनि कांहिं तरी दावि पराक्रम समग्र लोकांस ॥
काय सुपर्णें भ्यावें दावें स्वामित्व नीच चटकांस ? ॥ १७ ॥
बापा स्वतंत्रतेच्या समरीं जो लढुनि पावतो पतन ॥
तो शूर मर्द गाजी होतो अक्षय्य कीर्तिचें वतन ॥ १८ ॥
किंवा रणांगणीं जो स्वतंत्रतेच्या जयार्थ निजधाम ॥
पावतसे तो पूर्वजभटमणिमालेंत ओंवि निजनाम ॥ १९ ॥
जेणें करून जुलमी बादशहा ही मनांत भेदरती ॥
धारण पांचावरती बसे सुटे कंप तनुस थरथरती ॥ २० ॥
या परि त्या पुरुषांची उज्वल कीर्ती अखंड राहून ॥
शिकवी निज संततिला वळवा किता चि हा सराऊन ॥ २१ ॥
तीं त्यांचीं शूर मुलें भ्याडपलायनपथें जिण्याहून ॥
मरण चि उत्तम मानिति रणांगणीं स्वबल शौर्य दाऊन ॥ २२ ॥
आणीक एकदां तें स्वतंत्रतायुद्ध जुंपलें ह्मणजे ॥

देशाभिमान जागुन करिती जन सिद्ध ह्मणति आपण जें ॥ २३ ॥
अभिमानजागृती ती विजयरणौत्सुक्यबीज तें प्रेरी ॥
धारातीर्थी पडल्या बापापासूनि तों मुलांवेरीं ॥ २४ ॥
संघौत्सुक्यरणीं त्या मध्यें अपजय किती हि वेळ जरी ॥
झाला तरि निःसंशय अंतीं वीरांस त्या चि विजय वरी ॥ २५ ॥
हे धन्य भरतखंडा स्तुत्य महाराष्ट्रजनपदा वीरा ॥
हे शूर मराठ्यांच्या कीर्तिनिवासा सभाग्य रणधीरा ॥ २६ ॥
बापा या समयीं तूं जागृत हा सर्व आद्य इतिहास ॥
दाखीव सत्य करुनी शस्त्र करीं धरुन सर्व लोकांस ॥ २७ ॥
मोठे मोठे पूर्वी नामांकित भूप होउनी गेले ॥
त्यांच्या स्मारक छत्र्यांवरचे सांप्रत न लेख ही उरले ॥ २८ ॥
न तुझें तसें, कदाचित् झालें असलें पडून लिखित थिरें ॥
अनिवार कालचक्रें तरी न निर्मूळ आजि सर्व चि रे ॥ २९ ॥
बा तव नरवीरांच्या कृत्यांचीं स्मारकें बहू असती ॥
प्रत्यक्ष जागजागीं थोर उभीं ढळढळीत जीं दिसती ॥ ३० ॥
तीं कोणतीं ? तर पहा त्वदासमंतात भागीं सर्वत्र ॥
किल्ले प्रचंड लढुनी सर केलेलें अजिंक्य दृढ गात्र ॥ ३१ ॥
रामदळें सिंधु तशा उल्लंघित सिंधु नर्मदा यमुना ॥
इत्याद्यनेक दुस्तर थोर महानद नद्या न ज्यां तुलना ॥ ३२ ॥
नाना वृक्ष लता तृण पुष्प फळें धान्य धातु रुचिर मणी ॥
सर्वत्र ही सुबत्ता स्वातंत्र्योन्नति च मूर्ति अति रमणी ॥ ३३ ॥
हीं च तुझ्या तनयांचीं स्मारक चिन्हें पहा चिरंजीव ॥
जीं पाहुन तुजवर पर रिझती ह्मणती असें चि रंजीव ॥ ३४ ॥
त्या उच्च वैभव स्थितिपासुन या प्रस्तुतस्थितीवेरीं ॥
प्रति गोष्टीचें वर्णन न करीं पाल्हाळ सर्व आल्हेरीं ॥ ३५ ॥

इतकें चि सुचवितों कीं स्वर्गे न नीचत्व तूं चि घेशील ॥
तोंवरि विशाद रिपुची काय तुशीं तो चढून येईल ॥ ३६ ॥
सत्य चि त्या स्वीकारें तुज हें दासत्व येउं पाहतसे ॥
पाहतसे ! न चि आलें स्पष्ट वदायास काय दोष असे ॥ ३७ ॥
आणि ह्मणून चि तुजवर त्या जुलमी म्लेंछसद्विचा पगडा ॥
दिवसें दिवस अधीक चि दाबुन बसवीत चालिला रगडा ॥३८॥
तर हे नरपुंगव हो शूर पुरुष वीरपुत्रबांधव हो ॥
रणपटुजयभार्गव हो हें काय तुह्मांस योग्य लाघव हो ॥ ३९ ॥
निज पूर्वज कीर्तीवर पाणी ओतूं नका असें स्वकरीं ॥
रविला लाजविलें त्या शनैश्वरें येउनी जसें उदरीं ॥ ४० ॥
पूर्वप्रभाव तरि तो स्मरून उत्साह मनिं धरा कांहीं ॥
वेळ अशी सोन्याची नवसें येणार हो पुन्हा नाहीं ॥ ४१ ॥
शौर्यानें धैर्यानें कांहीं कर्तव्य दाखवा करुनी ॥
दवडूं नका असा हा अवसर हातांत बांगड्या भरुनी ॥ ४२ ॥
ही संधी गेल्यावर दास्य चि भाळीं, न मान मिळणार ॥
सर्व चि विटंबना मग कुतरे तुमचे न हाल खाणार ॥ ४३ ॥
सांप्रतचा हा किंचित् समय जरी शोचनीयसा दिसतो ॥
तरि न चि डगमगतां मनिं जा देवा शरण, दे न कां यश तो ॥४४॥
सर्वांनीं एक मतें विचार करुनी प्रयत्न केल्यास ॥
ईशकृपेनें मग जय नाहीं येणार काय अपुल्यास? ॥ ४५ ॥
यत्नांतीं परमेश्वर साह्य असें श्रेष्ठ जें सदा ह्मणती ॥
प्रोत्साहें झटतां बहु खोटी होईल काय हो ह्मण ती? ॥ ४६ ॥
सारांश अल्पमति ह्या सेवकवचनास मान देऊन ॥
गाडि हो कंबर बांधा उठा लढा वज्रदंड ठोकून ॥ ४७ ॥
वारंवार मला तर उत्तेजन देत मन्मनोदेवी ॥

मागेंपुढें न बघतां तुटुनि पडावें चि कतल उडवावी ॥ ४८ ॥
चोंहींकडून रिपुला गांठावें हाणमार मचवावी ॥
दावावें पौरुष त्या कीं त्यानें फिरुनि मान नुचलावी ॥ ४९ ॥
नर हो, रण सोडुनि हें विचार करितां पळूनि जाण्याचा ॥
धिक्कार रे तुह्मांला अर्थ अशा काय भीरुजगण्याचा ॥ ५० ॥
वांचुनि निर्माल्य असें दुर्लौकिक बांधुनी च पदरांत ॥
सोसुनि अपमान जिणें त्याहुनि मरणें चि धन्य समरांत ॥ ५१ ॥
दाखवितां पाठ रणीं व्यर्थ चि जन्मून शिणविल्या आया ॥
कुलकज्जल डाग असा लावुनि कीर्तीस घ्या न तो वांया ॥ ५२ ॥
मज हीं तुमची करणी न रुचे ह्रुदयांत शल्य सम जाची ॥
सुटला बाण करींचा येत न तो परत खास समजाची ॥ ५३ ॥
ऐशा अधमपणानें तुमची तुमच्या सभाग्य देशाची ॥
सुभटार्यपूर्वजांची विटंबना ते किती अपेशाची ॥ ५४ ॥
अतुल पराक्रम तुमचे गाति पवाडे प्रबंध भाट कवी ॥
स्त्रीजन हीं जात्यांवर दळितां गीतांत कीर्ति आयकवी ॥ ५५ ॥
तर आतां काय पुढें तुमचे हे नीच ढंग पाहून ॥
गातील तें स्मरा मनिं बोलावें अधिक काय याहून ॥ ५६ ॥
ह्यानें तुह्मांस कांहीं वाटत नाहीं च काय हो बाप ॥
ताप किती साही ते पडतां विषदंत मग पहा साप ॥ ५७ ॥
धन्य अहाहा! तुमच्या देशाचा काय नांवलौकीक ॥
काय पराक्रम तुमचा कोण दरारा दिमाख तो धाक ॥ ५८ ॥
काय बलोन्नति तुमची बुद्धि किती राजकारणी थोर ॥
काय प्रचंड सेना रणतांडवनिपुण ती बहादूर ॥ ५९ ॥
वर्णन किती करूं तरि, वीरानों, काय एक कीं दोन ॥
सारें चि थोर वैभव इंद्र हि लाजेल ज्यास पाहोन ॥ ६० ॥

सर्व चि तें आज असें रसातळीं जाउं पाहतें काय ? ॥
शिव शिव ! हाय ! कसें हें साहूं नीचत्व पोळतो काय ॥ ६१ ॥

सेवूनि भीरुता ही भोगावें दास्य दैन्य आमरण ॥
त्याहुनि बरें नव्हे का धारातीर्थीं पडूनि उद्धरण ॥ ६२ ॥

जी निज सुतकन्ये परि पाळियली रयत कळवळा धरुनी ॥
ती काय मोकलावी परहस्तीं वृत्ति खाटिकी वरुनी ! ॥ ६३ ॥

मुख्य असें ह्मणतों कीं दाखवुनी दोन हात यां समयीं ॥
झोडा परचक्राला जोडा लौकीक होउनी विजयी ॥ ६४ ॥

तलवार गाजवावी राखावी कीर्ति पुण्यनगराची ॥
श्रीवर्धनकर भटनृप गाजी श्रीमंत या वर पदाची ॥ ६५ ॥

रे ह्या अति तेजस्वी तुमच्या गादी समोर दरबारीं ॥
विनम्र होउनि टोपी काढुनि केली बहू मिनतवारी ॥ ६६ ॥

त्या क्षुद्र इंग्रजाला भिऊनि ऐसें अपेश घेण्यांत ॥
वाटत नसे चि कांहीं शरम तुह्मां काय पुरुष होण्यांत ॥ ६७ ॥

हरहर ! काय तरी हो दैवगतीचा विचित्र फेरा हा ! ॥
आणि किती इंग्रेजीसद्दीचा जोर हा तरी पाहा ॥ ६८ ॥

श्रीमंतांनीं प्रस्तुत दासाच्या नम्र ह्या विनंतीचें ॥
गौरव करूनि आज्ञा द्यावी कीं " शिंग द्या लढाईचें " ॥ ६९ ॥

बोला हो बोला हो वीरपुरुष हो अहो बहादर हो ॥
सरदार मंडळी हो बोला तुमचा विचार सादर हो ॥ ७० ॥

या समयीं सर्वांनीं विचार तो पोक्त पाहिजे केला ॥
वाटे शस्त्र धरुनि रणीं धैर्यें रिपु झोडपा चि शेखेला ॥ ७१ ॥

काय विशाद कितीशी सर्व तुह्मी जरि मनावरी घ्याल ॥
एका क्षणांत रिपुची भिरें भिरें चि उडवुनी द्याल ॥ ७२ ॥

मर्दांनो सोडुनि रण होता नामर्द कां असे भिडनी ॥
कुंदी काढा त्याची मर्दुमकी दाखवा क्षणिक तिमुनी ॥ ७३ ॥
आज्ञा असेल तर मी ( श्रीमंतांचे चि निमक ) हा दास ॥
धुरें धुरें उडवुनि त्याचा करितों चि एकटा नास ॥ ७४ ॥
नकळे काय तुह्माला भिववितसे शिशुंस बाउसा अरि तो ॥
सूर्यप्रभे पुढें बहु गमजा खद्योत काय हो करितो ॥ ७५ ॥
परवां तो आल्फिन्स्टन साहेब मला असें ह्मणाला कीं ॥
" सला करून मिटवा युद्ध नका जंग माजवूं लोकीं " ॥ ७६ ॥
" अमुची थोर सुशिक्षित चमु तुमची तशि नसे हि एकदिल " ॥
" करण्यांत सामना तीं गमे तुह्मां काय हो विजय वरिल? " ॥ ७७ ॥
उत्तर रोख दिलें त्या " ह्मणता तें सर्व कांहिं जरि असलें " ॥
" तरि हे मर्द मराठे कोठें कधिं हीं न आजवर हटले " ॥ ७८ ॥
" शरणागत होण्याहुन भूषण हे अधिक मानितात रणीं " ॥
" सत्येव रक्तपातीं बळि होतां मान्य होत तो तरणीं " ॥ ७९ ॥
तर हे स्थिति पाहुनिया साहेब हि तो ह्मणेल काय ? अहा ! ॥
हांस्य न घ्या करुनि असें भ्रम राखा मान्य व्हा न दुःख सहा ॥ ८० ॥
आणि असें हिं दुजें तो गेलासे कथुनि धूर्त पूर्वीं च ॥
कीं " नानाफडनविसामागें ह्या गादिची उतरती च " ॥ ८१ ॥
अक्षरशः तें सारें आज खरें काय पाहतें व्हाया ! ॥
कां व्हा तुह्मीच कारण त्या वचना साधुपात्रता द्याया ॥ ८२ ॥
थोर सनातन वैभव देशाचें कीं धुळीस मिळवाया ॥
कुलकंटक कां चि तुह्मी होता नरकीं स्ववंश बुडवाया ॥ ८३ ॥
शत्रु न तो आज गमे शत्रू केवळ तुह्मीच निज छाया ॥
घातक कुठारदंड चि होउनि झालांत सिद्ध खंडाया ॥ ८४ ॥
कां चि तुह्मी आज असें अगदीं घालूनि खालतीं पुच्छ ॥

२२

होता भागूबाई वीरकुलीं जन्म घेउनी तुच्छ ॥ ८५ ॥
बोलांत अमर्यादा होते; निरुपाय! आग पायांची ॥
जाते मस्तकिं पाहुनि तुमची हे रीति विभवनाशाची ॥ ८६ ॥
ऐसें नका करूं हो दावा स्वप्रभव धैर्य जोडून ॥
संग्रामीं तुमुल भिडा प्राणावरती उदार होऊन ॥ ८७ ॥
न उणीव कोणत्या ही गोष्टीची आपणास आज असे ॥
परिपूर्ण सिद्धता ती सर्वोपरि झटुनिया लढा च कसे ॥ ८८ ॥
सर्वत्र थोर डंका गाजत ह्या **ब्रह्मबादशाहीचा** ॥
तें पौरुष दावा त्या दर्प हरुनि गरुड जेवि सर्पाचा ॥ ८९ ॥
सिंह मतंगजयूथीं शिरूनि तत्काळ त्यास संहरितो ॥
दाणादाण करोनी मारा ठोका तसा तुह्मी अरि तो ॥ ९० ॥
निजपरकल्याणप्रद कृत्य करा हें प्रभूस वंदून ॥
निःसंशय विजयश्री तुह्मांस घालील माळ येऊन ॥ ९१ ॥

---

श्रीमंत भाग्यशाली कार्यधुरंधर गुणी महोदार ॥
स्वकुलावतंस वाक्पटु संभावित राजमान्य सरदार ॥ ९२ ॥
विश्वासास्पद सेना-नायक सरकार होळकर यांचे ॥
युद्धकलाभिज्ञचतुर अभिमानी स्तंभ शुद्ध राज्याचे ॥ ९३ ॥
स्तुत्य सखारामान्वित बापू साहेब रुचिर अभिधान ॥
विश्रुत उपनामांकित रेशिमवाले सुहृत्सुखनिधान ॥ ९४ ॥
सहजस्वराजनिष्ठा उत्कट धारिष्ट विक्रमासक्ती ॥
अनुपम अश्वारोहण-कौशल अति विमल बंधुगुरुभक्ती ॥ ९५ ॥
इत्याद्यनेक सोज्वल गुण ज्यांचे श्लाघ्य त्यांस तत्स्मरणीं ॥
अत्यादरभावें ही समर्पितों पद्यरूप लघु करणी ॥ ९६ ॥

---

तारीख १५ सेप्टेंबर सन १८८५ इसवी.

# बोधपदाष्टक.

पद १.

( राग जिल्हा; ठुंबरीची धाटी. )

गमाविशी वय निजेत सारें ॥ स्वहित मना तुज कळे न कां रे॥ध्रु०॥
शास्त्रज्ञानपराङ्मुखतापट॥पांघरुनि कां घोराशी बळकट॥ग०॥१॥
आलस्यांधतमसमौर्ख्य निशि॥सारुनि ज्ञानोदय कधिं बघशी॥ग०॥२
निजकर्तव्यें वैभव लोकीं ॥ पविति सज्जन कीं अवलोकीं ॥ ग० ॥ ३ ॥
वदत पंत कर विचार कांहीं ॥ भवस्वप्नाच्या उठ लवलाहीं ॥ग०॥४॥

पद २.

( राग जिल्हा; चाल साधी. )

कर निज तरणोपाय ॥ हे मन, कर निज तरणोपाय ॥ ध्रु० ॥
धनसुतदारा व्यर्थ पसारा ॥ भारि भरलाशी काय ॥ हे मन० ॥१॥
क्षणभंगुर हें जाइल सारें ॥ जाइजणा हा काय ॥ हे मन० ॥ २ ॥
प्रपंच हा भ्रम स्वहित करावा ॥ धर सद्गुरुचे पाय ॥ हे मन० ॥३॥
सत्वर कर हा विचार बरवा ॥ घडिपल वय हें जाय ॥ हे मन०॥४॥

पद ३.

( राग कालिंगडा; चाल साधी. )

कर कांहीं सुविचार ॥ हे मन, कर कांहीं सुविचार ॥ ध्रु० ॥
कोण मी कैसा कोठुनि आलों ॥ आणि कुठे जाणार ॥ हे० ॥ १॥
काय मी करितों आणि काय मज ॥ करण्याचा अधिकार॥हे०॥२॥
कोण कुणाचा मित्र बंधु धनि ॥ कुटुंब सुत परिवार ॥ हे० ॥३॥
पंत ह्मणे गुरुबोधतरीनें ॥ उतर भवांबुधि पार ॥ हे० ॥ ४ ॥

## पद ४.

( राग काफी; चाल साधी. )

कां करिशी अविचार ॥ हे मन, कां करिशी अविचार ॥ ध्रु० ॥
प्रभुलीलामृत सांडुनि सेविशी ॥ विषयसुरा अनिवार ॥ हे० ॥ १ ॥
जिंक्य रिपूंचा दास होउनी ॥ बुडविशि निज घरदार ॥ हे० ॥२॥
सत्या विसरुनि मिथ्या भजशी ॥ मायेचा बडिवार ॥ हे० ॥ ३ ॥
पंत ह्मणे संसार असारा ॥ भुलशी मानुनि सार ॥ हे० ॥ ४ ॥

## पद ५.

( राग धनाश्री; चाल साधी. )

साधुसमागम थोर ॥ कर मन, साधुसमागम थोर ॥ ध्रु० ॥
साधुसमागम भवभ्रम वारुनि ॥ करितो चित्त चकोर ॥ कर० ॥१॥
सद्विद्याबल देउनि राखी ॥ शासी षड्रिपु चोर ॥ कर० ॥ २ ॥
दयासुधाघन गर्जुनि बोधें ॥ शांतवि सेवक मोर ॥ कर० ॥ ३ ॥
जन्ममृत्युचे फेरे त्तुकवी ॥ मिटवी सर्व हिं घोर ॥ कर० ॥ ४ ॥

## पद ६.

( राग पिलु; चाल साधी. )

तूं बन साधुबुवा ॥ हे मन, तूं बन साधुबुवा ॥ ध्रु० ॥
जटा राखणें शांतिक्षमेच्या ॥ करुणातुंबि नवा ॥ हे मन० ॥ १ ॥
चर्ची षड्रिपुभस्म शरीरीं ॥ होउनि बेपरवा ॥ हे मन० ॥ २ ॥
सद्विद्यासत्समागमाचा ॥ तिलक सुधा बरवा ॥ हे मन० ॥ ३ ॥
सद्भावाचा बांधी फेटा ॥ गुणरंगी भगवा ॥ हे मन० ॥ ४ ॥
सद्वर्तनमणिमालास्मरणी ॥ भूषण भवविभवा ॥ हे मन० ॥ ५ ॥
सत्यवचन हा नाममंत्र जप ॥ ओडुनि नय प्रणवा ॥ हे मन० ॥६॥
प्राप्तस्थितिमुदतीर्थक्षेत्रीं ॥ धर्मं रिझवि जिवा ॥ हे मन० ॥ ७ ॥
पंत ह्मणे श्री प्रभुलीलाकृति ॥ गाई रात्रंदिवा ॥ हे मन० ॥ ८ ॥

पद ७.

( राग काफी; चाल होरीची. )

साधन भूतदया ॥ सार्थक जन्म कराया ॥ ध्रु० ॥
जपतपपूजन योग वियोग ही ॥ नलगे वेष धराया ॥ सार्थक० ॥ १ ॥
नलगे रामेश्वरगिरी यात्रा ॥ पुष्कर काशी गया ॥ सार्थक० ॥ २ ॥
शास्त्रपुराणें गीता पठणें ॥ सर्व ही याविण वाया ॥ सार्थक० ॥ ३ ॥
सर्वांभूतीं एकचि आत्मा ॥ वंदीत पंत तराया ॥ सार्थक० ॥ ४ ॥

पद ८.

( राग भैरवी; चाल साधी. )

तो चि जगीं प्रभुभाव ॥ हे मन, तो चि जगीं प्रभु भाव ॥ ध्रु० ॥
विश्वोत्पत्तिस्थितिलयहेतू ॥ अद्भुत शक्तिस्वभाव ॥ हे मन० ॥ १ ॥
पदार्थ मात्रीं कार्य कारणीं ॥ रम्य गुणागुणभाव ॥ हे मन० ॥ २ ॥
सारासारविचारिं जगाच्या ॥ कुंठित जैं मतिधांव ॥ हे मन० ॥ ३ ॥
पंत ह्मणे निज देहीं जागृत ॥ आत्मजोतिप्रभाव ॥ हे मन० ॥ ४ ॥

---

श्लोक.

ज्ञानवैराग्यसंपन्न ॥ निखिलोपमभूषण ॥
ब्राह्मणज्ञाति तैलंग ॥ नारायण नरोत्तम ॥ ९ ॥
त्या श्री सद्गुरुवर्यांसीं ॥ पूजाभावें समर्पिलें ॥
शुष्क हें तुलशीपत्र ॥ मनबोधपदाष्टक ॥ १० ॥

---

आक्टोबर सन १८७९ इसवी.

# अन्योक्तिसमूह.

## हिऱ्याविषयीं

### श्लोक.

जन्मस्थान क्षमा गुरुत्व सुषुमा धैर्यादिनेकीं गुणीं ॥
मुक्तेहूनि अधीक लौकिक तुझा विख्यात आहे जनीं ।
शंका हा च परंतु एक विष जें संहार सर्वोपरी ॥
सर्वांचा करि तें हिऱ्या त्वदुदरीं राहे; न मुक्ता वरी ।

### आर्या.

सर्वोपरि उत्तम तूं असशी हे हीरका तरी शोभा ॥
अंगा बांधुन घेउनि पावशि बापा न आणणें क्षोभा ॥ २

## मोत्याविषयीं

### साक्या.

विश्वाचा जो पालनकर्ता जलद तुझा तो तात ॥
पाशि वाढवी महा श्रेष्ठ त्या रत्नाकर ह्मणतात ॥ ३ ॥
कांति रूप अणि आंकारानें मौक्तिक तुज सम तूं च ॥
परि गुण उदरीं धरिशी तेव्हां ख्याति पावती साच ॥ ४

### आर्या.

जलद तुझा तात तसा पोषक आजा हि तो महाजलधी ॥
यास्तव गुणि व्हाया तूं घेशी छेदूनि मौक्तिका जलधीं ॥ ५
वर्णादिक सादृश्यें दावुनि शुद्धार्थभाव हंसाचा ॥
भोंदूं बघती बक हे सुमौक्तिका निज विचार कर साचा ॥

### श्लोक.

महा सुकुल कीर्ति बा तव विशाल पृथ्वीवर ॥
सुढाळ तव तेज हीं सुरुप आकृती सुंदर ॥

असे सकल ठीक हें परि सुरम्य हे मौक्तिक ॥
खऱ्या चढवि मूल्यते गुणद अल्प तो छेदक ॥ ७ ॥

---

## सोन्याविषयीं

### श्लोक.

सुवर्ण विनवी प्रभो प्रखर पावकीं तावितां ॥
घणें कठिण ऐरणी वर तनूस ही ताडितां ॥
न दुःख मज जाहलें बहु परंतु होतें अतां ॥
भिकार रति वाल यांसहित ताजवीं तोलितां ॥ ८ ॥

---

## पुस्तकाविषयीं

### श्लोक.

श्रृंगार सुंदर सुशोभित रम्य देहीं ॥
विद्या कलादि गुण वाहसि सर्व कांहीं ॥
अज्ञांस देशि उपदेश हि सुज्ञतेचा ॥
ग्रंथा, परंतु नुमजे तुज लेश त्यांचा ॥ ९

---

## स्लेटीविषयीं

### श्लोक.

करूनी तीक्ष्णा या प्रखर अति धारा करवती ॥
सरांरा शीलेच्या बळकठ शरीरा करवती ॥
अशा त्या शिल्प्याच्या सहन बहु मारा करितसे ॥
शिलेट प्रीतीनें अतुल उपकारीं झिजतसे ॥ १० ॥
स्लेटी द्वाड मुलें किती तव तनू राखुडिनें घांशिती ॥
जोरानें खरडूनि पेनसिलिंमीं स्वच्छंद गे कोरिती ॥
देती दुःख असें परोपरि परी ना कोपशी त्यांवरी ॥
हां हां ठीक चि गे खरें समजलों शीलोद्भवा तूं खरी ॥ ११॥

---

## घरट्याविषयीं

श्लोक.

मारुनि दक्ष पुरुषांस कटाक्षबाण ॥
घायाळ फार करिती युवती प्रवीण ॥
झालास हस्तगत तूं घरटा अशांच्या ॥
आतां नको रडुं उगा कृति साहिं त्यांच्या ॥ १२ ॥
आहेस थोर उपकारि सुवृत्त हीं तूं ॥
घट्टया महा हृदयशून्य चि रे परंतू ॥
गाण्यास शुष्क भुलुनी अगदीं स्त्रियांच्या ॥
होऊंनि हस्तगत नाचशि नाच त्यांच्या ॥ १३ ॥

आर्या.

दाणे किडे खडे यां सर्वांचें करिशि पीठ सरसकट ॥
स्त्रीकरगत अहृदय तूं तुज कैंचें तारतम्य रे घरट ॥१४ ॥

---

## मेघाविषयीं

श्लोक.

आशेनें पसरून चोंच बसलों व्योमीं निराधार या ॥
कष्टें तिष्ठत दीर्घ काळ तुझिया वृष्टीस इच्छूनिया ॥
वृष्टीची तर गोष्ट दूर च परी ना शब्द ही गोड तो ॥
मेघा आयकिला तुझा विधिवलें ह्या चातकें; प्रार्थितों ॥ १५ ॥

आर्या.

इच्छीं न चातका परि जलकण ही तोयदा न हो रुष्ट ॥
मी मोर भाषणावर आहें बा सर्वदा तुझ्या तुष्ट ॥ १६ ॥

---

## माळ्या विषयीं.

### श्लोक.

वेळोवेळ सुखाद्य जीवन बरें देऊनि नानापरी ॥
माळ्या वाढविलींस आजवर जीं पोसूनि बाळांपरी ॥
तीं झाडें फलपुष्पयुक्त लसतां चोरापरी त्यांजला ॥
घेशी काय अतां लुनाडुनि कशी येई न माया तुला ॥ १७ ॥

## माकडवाल्याविषयीं.

### श्लोक.

ज्याया खेळकल्या त्वदंकित बहू होऊनि हीं माकडें ॥
दारोदार फिरूनि खेळ करिती खाती तुझीं लांकडें ॥
कीर्तीमानसुखोपभोग अवघे तूं भोगिशी ज्यांमुळें ॥
त्यांना ऐशि विपत्ति! पोटभर ही खाया न पालामुळें ॥ १८ ॥

## रात्रीविषयीं.

### श्लोक.

शशीप्रकाशपीयुषास खावरून लाभतें ॥
निशीचकोर याजगांत शुक्लपक्षि शोभते ॥
बहूलपक्ष ये विरुद्ध कांतिलोप होतसे ॥
सुजाण सौख्यदुःख भोगिती समान ही तसें ॥ १९ ॥

अस्ता भास्कर जाउनी रजनि तूं दीना अनाथापरी ॥
होशी ग्लास तमीं हरूनि सुषुमा घे चंद्र ही पांढरी ॥
अभ्रें छाउन तारका चमकती सुज्ञान कोठें जशीं ॥
मित्र क्षुद्र सहाय दीप करितो देतो प्रकाशा तशीं ॥ २० ॥

## दीपाविषयीं.

### श्लोक.

रवीतेज आभाव रे ज्या स्थलास ॥
तशी चंद्रिका ही नसे ज्या निशीस ॥
तमें व्याप्त ऐशा प्रदेशीं दिव्या तूं ॥
करीं राज्य सौख्यें नको ठेवुं किंतू ॥ २१ ॥

---

## उदकाविषयीं.

### साक्या.

जीव जंतु तृण धान्यादिक ह्यां सर्वां जीवन देशी ॥
ह्मणुन जीवना जग तव आश्रय इच्छी नित्य विशेषीं ॥ २२ ॥
नांव तुझें जल योग्य असे बा बघशी ज्या ज्या रंगा ॥
त्या त्या वरिशी नीच स्थालिं तुज वास गमे बहु चंगा ॥ २३ ॥

### श्लोक.

चोरा परी त्यजुनि जाशि निज स्थलाशी ॥
उच्चत्व पावशि नभीं जलदाख्य होशी ॥
नीरा परंतु बघतां परतोनि मागें ॥
होतेस कृष्णमुखकाय नकाय सांगें ॥ २४ ॥

नाना रंग तरंग आंगीं वसतां नीचप्रदेशावडी ॥
होशी थोर पदीं सखार जलधी तें गर्जनेला चढी ॥
व्हाया रक्षण रत्नकोश जणुका ज्या दुष्ट नक्रादिकां ॥
नीरा पाळिशि ते व तूं बुडविता साधू असाधू सखा ॥२५॥

आंगीं तुझ्या दुर्गुण फार ऐसे ॥ असून नीरा अवघ्यां हवेसे ॥
आहेस एका जिवनत्व योगें ॥ ह्मणोनि त्वत्सेवन जाण भोगें ॥२६॥

---

## आस्वला विषयीं.

### साक्या.

बुरणुस कांबळ धुस्सा धाबळ बनात मरिना शाल ॥
आदिकरोनी परोपरीचीं वसनें बहु बहुमोल ॥ २७ ॥

बनती अविच्या ऊर्णे पासुन ह्मणुनि कातरुन तीतें ॥
घेती तेव्हां शीतादिक बहु बाधा सोसुन त्यातें ॥ २८ ॥

भाग पडे राहणें आस्वला भाग्य तुझें किति मोठें ॥
ईशें तुज बहु केश दिले पण त्यांत न हे गुण कोठें ॥ २९ ॥

---

## मेंढ्या विषयीं.

### श्लोक.

मेंढ्या आजवरी दया तुजवरी ठेवोनि बाळा परी ॥
आनंदें स्वघरीं सुखें बहु बरीं देवोनि नानापरी ॥
ज्यानें वाढविलें तयें च कुशिलें ह्या खाटिका वोपिलें ॥
कोणा दोष बलें अतां जरि खलें ह्यानें शिरा कापिलें ॥ ३० ॥

कैसें कसाब घर हें तुज लाभलें रे ॥
मेंढ्या नशीब चि गमे तव पाठमोरें ॥
पोसोनि हा जरि परोपरि गोड बोले ॥
जाया कसाब त्वदिं हें उमजोनि चालें ॥ ३१ ॥

मेंढ्या न तूज मृगराजपणा नसो तो ॥
न्यायें तुला चि बहु त्याहुनि मान येतो ॥
ये मृत्यु भेद घडतां चि मृगाशनाची ॥
दुःखें किती तव तनू हरिते जनांचीं ॥ ३२ ॥

---

## कोकीला विषयीं.

### आर्या.

दुर्दैवें कोकीला येउनि पडलाशि वायसा माजी ॥
उचित न आतां दुसरा उपाय मौन्याशिवाय सामा जी ॥ ३३ ॥
सद्रत्नें जरी ह्या ह्मणतिल तुज वा ह्मणोत मोना ते ॥
आत्म प्रिय आचरणाहूनि गमे अन्य रम्य कोणातें ॥ ३४ ॥
मंजुल सुस्वर वाणी गाउनि उपयोग काय रागांत ॥
गौरव न पावतां ती उलटी उपहास पात्र रागांत ॥ ३५ ॥

---

## मोरा विषयीं.

### आर्या.

मोरा रम्य पिसारा रूप तुझें वर्णनीय सर्व परी ॥
वाणी कर्कश फोडी कान नको बोलुं ते चि अहितकरी ॥ ३६ ॥

---

## कावळ्या विषयीं.

### आर्या

सुंदर वसंत आला येती आम्रास ही बहू पाड ॥
परि त्याची काय तुला मुखरोग्या कावळ्या असे चाड ॥ ३७ ॥

---

## बगळ्या विषयीं.

### आर्या.

अद्भुत नीति दशा या जलाशयावरिल कारभाऱ्याची ॥
वर्णादिक सादृश्यें जोड नका जोड हंसभाग्याची ॥ ३८ ॥

---

## माशी विषयीं.

### श्लोक.

अधूमक्षिका उष्णकाळीं सकाळीं ॥ फुलें तांबडीं पीवळीं शुभ्र काळीं ॥
विलोकी परींचीं परंतू मरंदा ॥ पिऊनी वमानी सदा ते प्रमोदा ॥ ३९

गेले सारे दिवस सखये मक्षिके भक्षितांना ॥
नाना मेवे रुचिर बरवे आणि गे क्रीडतांना ॥
केलें नाहीं पुढिल ह्रुदयीं आणुनी संग्रहातें ॥
तेव्हां आतां असुख तुजला सोस होईल तें तें ॥ ४० ॥

### साकी.

लवणसुखीं बहु निमग्न होऊनि रक्षण भावि न केलें ॥
आज मक्षिके मृत्युप्रद तें दुःखनिमंत्रण झालें ॥ ४१ ॥

---

## वृक्षा विषयीं.

### श्लोक.

शीतोष्ण साहुनि तरो पर पांथ यांशीं ॥
छाया करोनि बहु शीतल शांतवीशी ॥
ह्या वर्णनीय गुणिं एक दिसे चि खोड ॥
पोसे न अन्य उपयुक्त हि अल्प झाड ॥ ४२ ॥

---

## झाडाच्या रोपट्या विषयीं.

### श्लोक.

लागो न दुष्ट रिपुंचा तुजलागिं वारा ॥
कांटे हाणोनि असतां रचिलें अवारा ॥
हे क्षुद्र कंटक असे म्हणि बालवृक्ष ॥
आणूं नको; तव सुरक्षणिं हे चि दक्ष ॥ ४३ ॥

### आर्या.

येउनि थोरि इशारीं स्वहितफलोदय पुढें मुकाट्यानें ॥
व्हाया, तरुवरबाळा प्रस्तुत तूं वेष्टिलाशि कांट्यानें ॥ ४४ ॥

---

### पालसडलेल्या झाडाविषयीं.

#### श्लोक.

प्रभाविश्वर्यश्री रुचिर अवघी प्रस्तुत जरी ॥
तुझी गेली बापा तरि दृढ मनीं निश्चय धरीं ॥
दशाचक्राची ह्या स्थिति फिरुन थोड्या च दिवशीं ॥
सुखाला पूर्वीच्या मिळविल तरी माधव तुशीं ॥ ४५ ॥

---

### गलितपर्णां विषयीं.

#### गीत.

गरिब बिचाऱ्या कोमेलेल्या ॥ स्वस्थानातें जणु मुकलेल्या ॥
आणि मरणोन्मुख झालेल्या ॥ वरच्या हे पाना ॥ ४६ ॥

पवनाच्या प्रति झुळके सरशी ॥ इकडे तिकडे भटकत फिरशी ॥
जणों काय तूं झालें असशी ॥ खेळचि रे त्याचा ॥ ४७ ॥

थंड धुंद ह्या घन आकाशीं ॥ कोठुनि येउनि कोठें जाशी ॥
कृपा करुनि हें आम्हाशी ॥ सांगावें बापा ॥ ४८ ॥

श्रेष्ठ रम्यशा सागावरती ॥ सुखें वाढलों आजवरती ॥
विस्तृत हिरवे कोमल कांती ॥ सुंदर मी होतों ॥ ४९ ॥

परंतु छायाछन्न महा तें ॥ एकाएकीं प्रचंड वातें ॥
मोडुनि अवघें धुळीस मिळतें ॥ झालें; रति फिरली ॥ ५० ॥

तेव्हां पासुनि दुर्दैवानें ॥ दऱ्या दलदली डोंगर रानें ॥
यांतुन इकडे तिकडे जाणें ॥ आलें हें भाळीं ॥ ५१ ॥

धाल्लि काळजी सोडुनि सारी ॥ कांहिं नेणतां माहितगारी ॥
जेथें जेथें वायूलहरी ॥ नेती तें जातों ॥ ॥ ५२ ॥
विजयी वैभव सुमनें विमलें ॥ सौंदर्यास्पद गुलाब कमलें ॥
हर्षे नांदति ऐसें गमलें ॥ तिकडे गति माझी ॥ ५३ ॥

---

## शेवग्याचे शाडा विषयीं.

### आर्या.

साक्षेपबुद्धिनें बहु वाढविलें जीवनादि देऊन ॥
परि शेवग्या कसें त्वां निराश केलें कडूच निपजून ॥५४॥

---

## चंपक वृक्षा विषयीं.

### आर्या.

यःकश्चित तरु समजुनि आलें केलें हि चंपका न तुला ॥
लाजविशी तो च अतां तूं वासें घर भरोनि सर्व मला ॥ ५५ ॥

---

## आम्रफला विषयीं.

### आर्या.

खादाड दुष्ट जन हे सर्व च गिळितील कीं अनीतीनें ॥
म्हणुनि रसाला धरिशी अंतरिं काठिण्य काय भीतीनें ॥ ५६ ॥

---

## फणसा विषयीं.

### आर्या.

फणसा स्वरक्षणास्तव कंटक देहास घेशि जोडून ॥
परि अंतर मृदुल मधू होतो बा नाश त्याच पासून ॥ ५७ ॥

---

## कौंढळफळा विषयीं.

श्लोक.

हे कौंडला भडक रम्य सुवृत्ततेला ॥
दावोनि काय फसवूं बघशी अह्माला ॥
आह्मी न मूर्ख परि ना इतकें कशाला ॥
जाणों त्वदंतर विकुत्सित माधुरीला ॥ ९८ ॥

---

## नदा विषयीं.

श्लोक.

परजन्यकाळ क्षणि जाइल हा निघून ॥
ऐश्वर्य हें न तव राहिल ही टिकून ॥
झाडें तटावरिल पाडिशि तूं नदा हे ॥
हें पाप मात्र चिर एक जडोनि राहे ॥ ९९ ॥

# दृष्टांतावली.

## आर्या.

संसारीं ह्मणती जें सुख वाटे तें चि मूळ असुखातें ॥
राजस सेविति तें गुण मानुनियां विष विशंक असुखातें ॥ १ ॥
सूच्याग्रमूळ हें द्वय दुर्जनसज्जनगुणानुकरणाचें ॥
अग्र सरंध्र करी तें मूळ सुगुणयुक्त अंग वसनाचें ॥ २ ॥
सद्गुण टाकुनि दुर्गुण घेती खळ त्यांस तें चि हो रुचिर ॥
जरि लागली जलूका पयोधरा त्यागि दुग्ध पी रुधिर ॥ ३ ॥
पहिल्या रिपुच्या आधिन होउनि परनारिशीं कुसंगम रे ॥
इच्छूं नये दिव्याला कवळुनि वांचे न तो पतंग मरे ॥ ४ ॥
निजशक्ती गेल्यावर परसाह्यानें चि वागणें पडतें ॥
दृष्टीस मांद्य येतां उपनेत्रावीण पाहणें अडतें ॥ ५ ॥
झिजवा परोपकारीं देहा विलसा महत्पदीं मिरवा ॥
झिजुनी साणे वरती चंदन परभाळिं शोभतो हि रवा ॥ ६ ॥
खल दिसती साधूसे जरि वरि तरि दुष्ट अंतरीं गुप्त ॥
कौंडल वरून दिसतें सुंदर परि आंत कटुपणें लिप्त ॥ ७ ॥
समयीं अल्प हि वस्तू मागें सारी महान तेजाला ॥
छत्री क्षुद्र निवारी भानूच्या प्रखर उष्ण किरणांला ॥ ८ ॥
ग्राहकशक्तिविना गुण झिजवुनि देहा कधीं हि न मिळे तो ॥
करितां हिशोब फलका वरतीं खडु काय थोडका झिजतो ? ॥ ९ ॥
दैवानुसार मिळते लोकीं ह्या योग्यता नरा हो तीं ॥
गृह मंदिर शौचकुपीं लागति पाषाण देव ही होती ॥ १० ॥
स्नेह करावा त्याचा ज्याच्या योगें जगांत कीर्ति बढे ॥
परिसाच्या संगानें लोहाला कीं सुवर्णमोल चढे ॥ ११ ॥
शाई ज्याशीं करिते स्नेह तया दे स्वरूप ना सोडी ॥

देहीं प्राण असे तों पण वद लाभास काय त्या जोडी ॥ १२ ॥
स्वातीचें मेघोदक होतें संयुक्त शुक्तिशीं हि जरी ॥
त्यापासुन उद्भवती उत्तम तेजाळ मौक्तिकें चि खरीं ॥ १३ ॥
सुज्ञाज्ञ बाह्यरूपें सम परि गुण ताडितां चि ओळखती ॥
न फुटे घणें हिरकणी कांच चुरे समचि दोन्हि लखलखती ॥ १४ ॥
झाला त्रास किती तरि रसज्ञ सोसूनि ते गुणा वरिती ॥
अलि कंटकादि दुःखें नगणीं गंधार्थ केतकी वरती ॥ १५ ॥
असतो हि दुर्गुणीं गुण एखादा तो चि मोहि जनसुमनें ॥
कांटेगुलाब सर्वां होतो प्यारा सुगंधिच्या सुमनें ॥ १६ ॥
श्रीमंत तो चि होतो खर्च कमी प्राप्तिहूनि जो करितो ॥
जल येण्याहूनि जया जाता नळ सान हौद तो भरतो ॥ १७ ॥
दुर्गुण जाउनि सद्गुण सहजीं येतात संतसत्संगीं ॥
जैसें चुंबकसंगें लोह वरी चुंबकत्व निज अंगीं ॥ १८ ॥
रिपु न गणीं अल्पकधीं अल्प तरी तो महा करिल घात ॥
मोठ्या तृणराशीचें भस्म करी अल्प ठिणगि निमिषांत ॥ १९ ॥
सज्जन कठोर दिसले वरुनि तरी मृदुल अंतरीं असती ॥
सेवा करितां मेवा नारळ जणु मिष्ट खोबरें देती ॥ २० ॥
थोर सुवृत्त कलानिधि कसाहि असला तथापि नीचकरीं ॥
पडतां तमरूप दिसे जैसे राहूमुखांत सोमहरी ॥ २१ ॥
नीचास भाग्य चढतां थोर हि त्याच्या चुराडती हुकुमीं ॥
गंजीफाखेळांतीं उतरे राजा हि अन्य लघु हुकुमीं ॥ २२ ॥
भूषादिक श्रृंगारें पावे समता न मूर्ख चतुराची ॥
श्रृंगारिलाहि रासभ तरि ये सरि त्यास काय तुरगाची ॥ २३ ॥
झिजतो परोपकारीं क्षुद्र परंतू बहूत कुरकुरतो ॥
घट्ट पदार्थ दळितो पीठ परी तो विशेष घरघरतो ॥ २४ ॥

जन मूर्ख रानटी ही सुशिक्षणें ज्ञानवंत होत बरा ॥
कौशल्यें शिल्प्याच्या बनती पाषाण तेचि मूर्ति शिरा ॥ २५ ॥
सारासार विचाराविण विद्याभार काय कामाचा ॥
असती ग्रंथीं विद्या बहु परि उपयोग काय त्या त्यांचा ॥ २६ ॥
अल्पोपद्रव टळण्या सर्वसुखाश्रयपदा न टाळावें ॥
काय प्राज्ञें सदना आखूपद्रवशमार्थ जाळावें ? ॥ २७ ॥
महदाश्रित नीच कुजन जरि तरि तो सेव्यमान अन्यांस ॥
पूजिति अवश्य लोकीं प्रभुप्रसंगें चि पांचजन्यास ॥ २८ ॥
धरितां नम्रपणा बहु करुणा करणार कोण हो नाहीं ॥
निम्न स्थलाकडे जल धांउनि जातें स्वभावता पाहीं ॥ २९ ॥
सज्जन सहिष्णु असला तरि न छळावा चि मान राखावा ॥
बहु मिष्ट इक्षु झाला ह्मणुनि मुळासकट काय तो खावा ? ॥ ३० ॥
स्वपराच्छिद्रें झांकुनि अन्योन्यें शोभल्यास वैभव तें ॥
पागोटें जीर्ण जसें स्वता तसें परशिरा हि शोभवितें ॥ ३१ ॥
सज्जन निजगुणतेजें सदसन्नीचोत्तमादि पंथांस ॥
दाविति रविशशि जैसे सृष्टींतिल सर्व ही पदार्थांस ॥ ३२ ॥
पंडित आणि अपंडित रूपें सम समय जरि न बोलाचा ॥
पिक काक एक दिसती उदय न तों जों वरी वसंताचा ॥ ३३ ॥
आश्चर्य काय आपण उपकृति केल्यास माणसां वरती ॥
निर्जीव खांब माथां परछायेस्तव गृहास सांवरती ॥ ३४ ॥
महदाश्रयीं असे जो मान न तो तोचि आसरा सुटतां ॥
असतो केश शिरीं तों वागविती त्यास फेंकिती तुटतां ॥ ३५ ॥
विषयाच्या नादानें विषयी तन्वर्थकीर्ती नागविती ॥
पुंगीस लुब्ध होउनि जैसे निजदंत भुजग पाडविती ॥ ३६ ॥
स्नेही ते चि खरे जे आपण होऊन नित्य अन्य जनां ॥

संरक्षिति सहज जसे हात शरीरास पापण्या नयनां ॥ ३७ ॥
वर्षाकाळीं कोकिळ अवलंबिति मौन तें चि उचित दिसे ॥
दर्दुर वक्ते तेथें शोभा पिकभाषणांत काय असे ॥ ३८ ॥
विद्येनें गर्व जडे ज्याला विभवें जडे हि कृपणपणा ॥
तो दैवशापहंतचि सलिलोत्थितवन्हिदग्धमनुज गणा ॥ ३९ ॥
अद्यापिं स्तुतिकन्या कुमारपण दुर्निवार वाहतसे ॥
थोरांस ती नरुचते अन्य न रुचती तिला हि थोर तसे ॥ ४०
निष्कपट सख्य करणें करणें उपकार बोलणें मधुर ॥
धर्म चि हा सुजनांचा नैसर्गिक जेवि इंदु शीतकर ॥ ४१ ॥
अधिकार पूर्ण येई तों वर मौन स्विकारुनी चतुर ॥
बैसति उगा जसे पिक जों न फुटे सर्वमान्य रव मधुर ॥ ४२ ॥
वर्चस्व चालतें जनिं सर्वांचें आप आपल्या जागीं ॥
नावेंत गाडि उदकीं चाले गाडींत नाव भूभागीं ॥ ४३ ॥
गोष्ट सुयुक्तिक घ्यावी बाळां पासून ही शहाण्यांहीं ॥
रविविषयवस्तु समयीं दीपें दिसणार काय हो नाहीं ॥ ४४ ॥
अधिकारतेज घटतां चाले प्राबल्य नीच लोकांचें ॥
दिन अस्तंगत होतां रात्रीं पिकतें विशेष घूकांचें ॥ ४५ ॥
क्षोभवितां तेजस्वी प्रकटविती स्वप्रभाव तत्काळ ॥
भडके पावक इंधन चाळवितां काढि ही फणा व्याळ ॥ ४६ ॥
थोरांचीं वृत्ति सदा मालतिपुष्पा समान दों परिंची ॥
शोभावें लोकशिरीं किंवा स्वस्थळिं लयास जावें ची ॥ ४७ ॥
लोकोत्तर गुणलौकिक अति सत्वर पसरतोचि लोकांत ॥
आपोआप जसा तो चोहिंकडे तैलबिंदु उदकांत ॥ ४८ ॥
जरि बोल दुर्जनाचे प्रिय सस्मित सरळ गोड वा उचित ॥
दिसले तरी भयप्रद अकाल कुसुमा परीच ते खचित ॥ ४९ ॥

हस्तिरूपादि न बघतां सद्गुण घ्यावा चि जो असे ज्यांत ॥
वर्णादि सौष्ठवाहूनि अर्थ सुरस अधिक मान्य लेखांत ॥ ५० ॥
दुष्टाचा संगम तो बरा नव्हे घात होतसे त्यानें ॥
बदरीप्रसंग घडतां कदलीचीं फाटती च कीं पानें ॥ ५१ ॥
वस्तु अनर्थप्रद ती आवडली बहु तरी हि त्यागावी ॥
काय सुरी सोन्याची सुंदर तरि पोटिं मारुनी घ्यावी ॥ ५२ ॥
जो ज्यारा वाटतो गुण बरवा त्यालाच देत आदर तो ॥
जैसा कोकिळ अंबा प्रेमें निंबोणि कावळा वरतो ॥ ५३ ॥
आस धरावी त्याची ज्या पासोनी मिळेल कांहिं तरी ॥
भागे न तृषा ऐशा श्रमुनी उपयोग काय शुष्क सरीं ॥ ५४ ॥

## साङ्गत्या.

द्वाड न सज्जन कोणि जन्मती होती सहवासानें ॥
जैशा ऊन मऊ लाखेच्या भिन्न मूर्ति सांच्यानें ॥ ५५ ॥
दुर्जनसंगें सुजना दुर्गुण बहुधा लागत नाहीं ॥
पन्नग वसती तरि तो तरुवर चंदन निर्विष राही ॥ ५६ ॥
नीच नीचता त्यजी न जरि त्या झाला साधूसंग ॥
चंदन तरुवर राहे तरि तो अविष न होय भुजंग ॥ ५७ ॥
होते प्राप्त पहा गुणवंता संपदा न गुणहीना ॥
गुण असतां घट विहिरीचें जल काढी न चि त्यावीना ॥ ५८ ॥
कधीं कधीं गुण दोष होउनी देती क्लेश शरीरा ॥
मधुर भाषणें तीं च घालिती पंजरबंधीं कीरा ॥ ५९ ॥
मिष्ट वस्तु ती मिष्ट नव्हे तर आवड गोड जनांत ॥
मधुर शर्करा त्यागुन अमली कडू अफू खातात ॥ ६० ॥
होतां स्थानभ्रष्ट चि आपण मित्र हि तापद होतो ॥
उपडुनि पडलेल्यां कमळांतें मित्र करपवी हो तो ॥ ६१ ॥

क्लेश हि देतां साधू पासुनि पूर्ण होय पर-आस ॥
घर्षण करितां ही अन्या दे चंदन रुचिर सुवास ॥ ६२ ॥
अंतरिं पोकळ असे तरी ही संस्कृत गुरूकरानें ॥
होतां मोही बोलुनि मधु जणु वेणू निजस्वरानें ॥ ६३ ॥
साधुपरी कधिं जड हि साहजिक झिजतो परोपकारीं ॥
कूपमुखाचा चिरा घटगुणीं झिजे ओपितां वारी ॥ ६४ ॥
निजहितवादी बुद्धिपुरःसर टोंचितो चि वच माना ॥
जैसा माळी गुणी कराया विंधी कीं सुमनांना ॥ ६५ ॥
शीलपरत्वें मान्य चि होतीं हितवचनें लोकांस ॥
फलद वसंतीं आम्र कोकिळा रुचिर निंब काकांस ॥ ६६ ॥
परक्याचें धन परांस वांटुनि वदान्यतेची थोरी ॥
कोणी व्यर्थ चि पावति जणु घन वर्षुनि वारिधिवारी ॥ ६७ ॥
निज महतीची किंमत घटते नीचाच्या संगानें ॥
उत्तम सोनें हिणकस होतें डांकाच्या योगानें ॥ ६८ ॥
एकोप्यानें विशेष शोभा लाभतसे जगतांत ॥
पानसुपारीकाथचुना हीं मिळाफांत रंगतात ॥ ६९ ॥
नीच न चुकतो नाश कराया विसरुनि ही उपकार ॥
जीवनदात्या स्नेहाचा जणु दीप करी संहार ॥ ७० ॥
गुणवंतास हि निजगुणमहिमा प्रकट कराया साठीं ॥
लागे नीचा सवें झिजाया कनका जेविं कसोटी ॥ ७१ ॥
व्हाया भाग्योन्नति गुरुवचनें खरतर ही सोसावीं ॥
घाव घणाचे सोसुनि दगडें देवकळा मिरवावी ॥ ७२ ॥
सरळपणाहूनि वक्रता चि कधिं शोभतसे व्यवहारीं ॥
प्राह्य चि दंडास्तव शिबिकेच्या वेणू वक्र शरीरीं ॥ ७३ ॥
जातिमहत्व चि न पडे कामीं महदाश्रय मिळवाया ॥

हो तनुखंडित परगुणसंयुत दुकूल कंचुकि व्हाया ॥ ७४ ॥
प्रमाण मिश्रित भिन्नगुणैक्यें विशेष शोभा अंगीं ॥
पानसुपारीकाथचुनायुत हो तांबूल सुरंगी ॥ ७५ ॥
कुलजातीहुन जगिं सन्माना मुख्य चि गुरुसंस्कार ॥
जसे कांचना योग्य भूषणीं भूपति सुवर्णकार ॥ ७६ ॥
नीच मनाचे अधिकारी जंव न पडे खाद्य मुखांत ॥
तों वर करकर करिती जणु रथचक्रें ओंगणिं शांत ॥ ७७ ॥
खाउं घालितां अपुल्या तंत्रें वागुनि करिती काज ॥
मार खाउनी गोड बोलती सेवक जणु पखवाज ॥ ७८ ॥
समयीं थोरास हि नीचाचा ठेवणें चि सत्कार ॥
भाग पडे जणु शौचकुपाचा शुचिकाळीं स्वीकार ॥ ७९ ॥
समयीं क्षुद्र हि प्रकट करीती महत्व जगिं थोरांचें ॥
जसें ताजवीं वजन दाविती वालगुंज सोन्याचें ॥ ८० ॥
परगुणगौरव करितां सहजीं ख्याति आपुली होते ॥
वर्णनसौष्ठवगुणें चि कविता श्रेष्ट मानिली जाते ॥ ८१ ॥
प्रत्यहि थोडें थोडें करितां काम विकट ही मोठें ॥
पूर्ण होतसे जसें महा सर बिंदुबिंदुनें सांठे ॥ ८२ ॥
समयीं दानें विशेष फलद्रुप विपरित तें चि अकाळीं ॥
जशि वर्षा ऋतुवर्षाकाळीं करि तृणधान्यसुकाळीं ॥ ८३ ॥
रंगरूप ना बदले तरि ही बदले गुण सहवासीं ॥
हितकर हो गुळवेल रसाळीं चढतां शेरिं न तैसी ॥ ८४ ॥
मान होतसे गुणा पासुनी तो न गुणा वांचोनी ॥
राघू मैना पाळिति सारे काक न पाळी कोणी ॥ ८५ ॥
होति समर्थां सहाय अवघे कोणि न हो गरिबाला ॥
वायु अग्निला चेतवितो तो मालवितो दीपाला ॥ ८६ ॥

शक्ति न चाले बळवंताशीं जोर दुर्बळीं थोर ॥
अचल न हलवूं शके पवन, तरु उखडुन फेंकी दूर ॥ ८७ ॥

स्वार्थाचे ते सखे सोयरे न स्वार्थाविण कोणी ॥
सफल तरुवर वसति विहंगम विफला जाति त्यजोनी ॥ ८८ ॥

थोर पुरुष जें ह्मणती त्यास चि देती सर्व रुकार ॥
अनंग त्याचें वर्णन करितां रम्य रूप आकार ॥ ८९ ॥

दुष्कृति करुनी सौख्य वांच्छितां प्राप्त कसें होईल ॥
अर्क लावितां अंगा कोठुन खाज वरी येईल ॥ ९० ॥

मिथ्यावादी सत्य वदे तरि सत्य न मानी कोणी ॥
ढोंग चि ह्मणती नकल्या दुःखें रडतां ही विवळोनी ॥ ९१ ॥

उच्च स्थानीं बसुन गुणाविण थोरपणा न च येत ॥
बसून देवालयशिखरावर वायस गरुड न होत ॥ ९२ ॥

असति सहोदर तरी प्रकृतिगुण भिन्न परस्पर जागे ॥
मारी विष पियूष वांचवी निपजति एक चि जागे ॥ ९३ ॥

घटतां तेज अवश्य अवज्ञा होते मग लोकांत ॥
निस्तेज विझतां राखेला त्या भलते ही शिवतात ॥ ९४ ॥

गर्व कधीं ही न करावा धनतारुण्याचा लोकीं ॥
बघतां बघतां जाति लयाला ढग गगनीं अवलोकीं ॥ ९५ ॥

पहा पराधिन होतां प्राणी साही दुःख अपार ॥
धरलेला गज बंधन पावे सोशी अंकुशमार ॥ ९६ ॥

विद्यासद्गुणविहीन मानव पंडितचतुरसमाजीं ॥
शोभा पावत नाहिं जसा बक हंसमंडळी माजी ॥ ९७ ॥

उद्योगाविण विद्याधन तें प्राप्त कसें होईल ॥
हालविल्याविण कैसा वारा पंख्याचा येईल ॥ ९८ ॥

दया कधीं ही उपजत नाहीं दुष्टांच्या ह्रदयांत ॥
हिंसा टाकुन द्यावी ऐसें वसे न सिंहमनांत ॥ ९९ ॥

गुण तें रूप न गुण न रूप तें बहुधा हाचि निबंध ॥
दोन्हि गुणें युत असे न कोठें सुवर्ण आणि सुगंध ॥ १०० ॥

आप आपले गरजी सारे करिति खुशामत थोर ॥
वर्षाकाळीं मेघा गाती चातक नाचति मोर ॥ १०१ ॥

मिळतां प्रकृतिस्वभाव मिळतें मन न चि त्या वांचून ॥
दूध विरजलें जाय दह्यानें कांजीनें नासून ॥ १०२ ॥

अल्पबुद्धिपुरुषाच्या पोटीं राहे मोठि न गोष्ट ॥
अच्छेराच्या मापामध्यें शेर न मावे स्पष्ट ॥ १०३ ॥

करा परिश्रम गुणि व्हा मिळवा मान राजदरबारीं ॥
विंधुन घे गुणिं बद्ध होत तें मोतीं शोभे हारीं ॥ १०४ ॥

पोटासाठीं बहुविध खटपट करितो आर्य अनार्य ॥
गाति नाचती रणांत भिडती सेविति कार्य अकार्य ॥ १०५ ॥

प्रिय वस्तू ती अप्रिय होते समय विशेषीं जागा ॥
सह्य उष्ण हो शिशिरीं ग्रीष्मीं असह्य तें लोकांना ॥ १०६ ॥

असुनि गुणें गुरु लघुता वरितां पावत जगिं सन्मान ॥
मंद वाहिल्या अभिमत होतो सुरभिशीतपवमान ॥ १०७ ॥

जेथें ज्याचा अर्थ साधतो तें चि आवडे त्याला ॥
रात्र चांदणी प्रिय न गमे जशि अंधारी चोराला ॥ १०८ ॥

केवळ जड तो काय समजतो बुधजनवचनविलासा ॥
जसे न जाणति बेडुक कधि ही निर्मळ कमलसुवासा ॥ १०९ ॥

दुःख सोशिल्याविना न कोठें कोणी ही गुणि होत ॥
विंधुन बांधुन घेई तेव्हां सुमन होय गुणवंत ॥ ११० ॥

परकी तो परकी च न अपुला समजा कोणि निदानीं ॥
कोकिलबाळ न हो कागाचा वाढविला जरि त्यांनीं ॥

धना सवें मन वाढतसे परि घटतां तें न घटे ह ॥
जलज जलासह वाढे परि जल घटतां तसें चि राहे ॥ ११२ ॥

बोला वरुनी लहान मोठे जाणावें चि मनांत ॥
ओढा खळखळ करितो भारी ओघ नदाचा शांत ॥ ११३ ॥

सुष्ठु भाषणें न पावती कधिं नीचमुखांत विकास ॥
हिंग लसुण हीं कधीं न वरिती कस्तूरीचा वास ॥ ११४ ॥

श्लोक.

संसारीं सुखभाग्य योग्य रितिनें भोगावया निश्चयें ॥
सामान्यत्व बरें गुणीं अवगुणीं आधिक्य कामा नये ॥
बेदाणा अति मिष्ट यास्तव पडे सारा चि तो पाचनीं ॥
निंबोणी अति तिक्त केवळ तिचा आव्हेर होतो जनीं ॥ ११५ ॥

होतां मित्रवियोग शुष्क बनणें सन्मित्रता ते खरी ॥
येतें दूषण वैपरित्य घडतां निंदी जगद्वैखरी ॥
शाई लेखणिचा वियोग घडतां पत्रावरी सत्वरी ॥
वाळे शाइ परी तसें नघडतां धूळा पडे तीवरी ॥ ११६ ॥

नोहे म्लाना मुखश्री कधि हि न हृदयीं खेद अश्रू न डोळां ॥
नोच्चारी जीभ दैन्या कधि हि न चढते भ्रू न आठी हि भाळा ॥
संतोषी सौख्यदुःखीं सममति विपदा संपदा संकटांत ॥
संसारीं मर्द तो चि प्रमुदित नर जो कोणत्याही स्थितींत॥ ११७॥

---

# स्फूट

## श्रीमंत सरकार होळकर बहादुर यांच्या सलामीचें

### पद.

( राग जिल्हाझिंझोटी; ठुंबरीची धाटी. )

प्रभो प्रार्थना पारसा अमुची द्या सुख पाळुनि राजाला ॥ ध्रु० ॥
देवा, अमुच्या महाराजांच्या राखीं विजयी भाल्याला ॥
आणि करोनी राज्य सदोदित देवो सुख तो देशाला ॥ प्र० ॥ १ ॥
डंका विजयश्रीचा चहूंकडे सुखें वैभवें भगवंता ॥
वाजो चालो राज्य निरंतर कांहीं अडचण ना येतां ॥ प्र० ॥ २ ॥
उत्तम उत्तम असतिल वस्तू ज्या ज्या तुमच्या भांडारीं ॥
देउनि त्या त्या अमुच्या राजा राज्य करो तो सुखकारी ॥ प्र० ॥ ३ ॥
निर्दाळीं बा शत्रू अमुच्या महाराजांचे जगदीशा ॥
अजातशत्रू इंद्रपुराधिश सुकीर्ति जावो परदेशा ॥ प्र० ॥ ४ ॥
राज्याविषयीं उलाढालिचे विचार रिपुंचे प्रभु नाशीं ॥
आणिक भंगीं कुतर्क भलते त्राता अह्मातें तूं असशी ॥ प्र० ॥ ५ ॥
कानुकायदे पाळुनि राजा देवो सुख तें बहु आह्मां ॥
त्याच्या सुखास्तव भक्तवत्सला सर्व प्रार्थितों आह्मि तुह्मां ॥ प्र० ॥ ६ ॥
दीनदयाळा प्रभो समर्था हस्त मस्तकीं ठेवावा ॥
संतति संपति वर्धन पाउनि भूप चिरायू हा व्हावा ॥ प्र० ॥ ७ ॥
जगदुद्धारा प्रजामनोरथ कळवितसे या पदस्तवनीं ॥
आज्ञांकित हा सोमनाथसुत ठेउनि भाळा तव चरणी ॥ प्र० ॥ ८ ॥

---

आक्टोबर सन १८६३ इसवी.

# मैत्री.

### अभंग.

हरेक प्रसंगीं हरेक प्रकारें ॥ साह्य परस्परें देती मित्र ॥ १ ॥
खऱ्या मित्रत्वाचें मुख्य हें लक्षण ॥ संकटीं रक्षण करणें ची ॥ २ ॥
परी ही सद्गुणपात्रता कधीं ही ॥ अपेक्षीत नाहीं खरा मित्र ॥ ३ ॥
जरी हें बोलणें दिसे उफराटें ॥ विचारीं चोखटें प्रेमाधिक्य ॥ ४ ॥
साह्यतेला मूळ कारण आपत्ती ॥ इच्छील मित्रा ती कैशी मित्र ॥५॥
मित्र परस्पर बोलती सर्वत्र ॥ परी ऐसा मित्र विरळाची ॥ ६ ॥
सन्मित्रमहिमा नाहीं अपपर ॥ वाचाळ पामर काय जाणे ॥ ७ ॥
सख्याची हे कळा जाणे तो चि सखा ॥ येर तो पारखा ह्मणे पंत॥८॥

# संसारनाटक.

### पद.

( साध्या एकताली लावणीची धाटी )

मृत्युलोक ह्या रंगभूमिवर मानव नाटकि खेळकरी ॥
स्ववयोवस्था रूपें बरवीं सोंगें नटुनी परोपरी ॥ धु० ॥
अन्य नाटका समान ह्यांत हि प्रवेश निर्गम ते असुनी ॥
सात अंक मुख्यत्वें होती मनुजवयाच्या स्थिति वरुनी ॥
मनुष्य एक चि अनेक सोंगें निज आयुष्यावस्थांनीं ॥
नटुनी अद्भुत वेष करितसे अनुरूप पात्रीं वतावणी ॥ मृ० ॥ १ ॥
प्रथमारंभीं बाल्यावस्था पात्र रम्य गोजिरवाणें ॥
आइ दाइच्या कडिखांद्यावर वागे बालक अति चिमणें ॥
निजे पाळणीं कधीं क्षणोक्षण क्यांहां क्यांहां कीं रडणें ॥
कधीं ओकणें लाळ गाळणें कधीं मुकुलमुख मृदु हसणें ॥ मृ० ॥ २ ॥

नंतर पौगंडावस्था ये तंव तो विद्यार्थी होई ॥
उठे पहांटे खुशींत बहु परि हौस खेळण्याची ह्रदयीं ॥
रुमाल कांखे मारुन शाळे जुलुमें रेंगाळत जाई ॥
होतां सुटि मग कुल्पास लाउनि पाय उडत की घरिं येई ॥ मृ० ॥ ३ ॥

तृतीय अंकीं यौवन हे स्थिति येतां कामानल भडके ॥
ध्यानिं मनीं मग ध्यान युवतिचें रमे मनोहर मंजु निकें ॥
प्राणसखीच्या कटाक्षपातें विव्हल हो बहु जीव पिके ॥
वेड्या परि मग गाइत फिरतो तत्पर श्रृंगारिक चुटके ॥ मृ० ॥ ४ ॥

चतुर्थ अंकीं रोजगारि हो बोल चाल मानी तोरा ॥
मिशा फांकड्या वेष नेटका ऐट मिजाशी बहु नखरा ॥
हेवा मानापानाचा अति क्षुद्र गोष्टिवर तडणारा ॥
मृगजलकीर्तीस्तव तोफेच्या साहे सिद्ध ही भडिमारा ॥ मृ० ॥ ५ ॥

पंचम अंकीं प्रौढावस्था यथेष्ट शाल्योदन गाढें ॥
राजश्रीनें दोंद सुटे मग प्रस्थ बहुश्रतिचें वाढे ॥
जेठा बांधुन बसे, वांकडें पाहि बोलतां स्फुरण चढे ॥
यंव् करावें त्यंव् मरावें श्लोक दाखले झोंकि पुढें ॥ मृ० ॥ ६ ॥

षष्ठम अंकीं येत जरास्थिति दोंदबीद वपु झडे तदा ॥
पंच्या हलका ढुंगाला मग नाकावर उपनेत्र सदा ॥
डगले ज्यानिचे पोतीं होती धीर काठिचा पदोपदा ॥
गांभिर्याचा बोल पालटे निघे मुला परि स्वर मंदा ॥ मृ० ॥ ७ ॥

सप्तम अंकीं वृद्धावस्था जखख पात्र हें शेवटिचें ॥
चरित्र संपवि जणु मनुजाच्या अचाट नाना खटपटिचें ॥
श्रोत्रनेत्रमतिहीन विलक्षण, शुद्ध बोळकें तोंडाचें ॥
बाल्यावस्था दुजीच हे जणु भान पुरे ही देहाचें ॥ मृ० ॥ ८ ॥

## कोणा कामिनी विषयीं कामुकाची उक्ती

पद.

( राग जोगी; साकीची धाटी. )

नकळे ईप्सित केवि घडे ॥ गुंते मन रमणिकडे ॥ ध्रु० ॥
कोणिकडे हें अकार्य आणिक कोणिकडे तें थोर ॥
शशिकुल पण ती फिरुन मजला दिसेल का सकुमार ॥ गुं० ॥१॥
दोष न घडण्यास्तव माझें ना शहाणपण हा सारें ॥
पण कोपांतहि रम्य तिचें किति तें मुख गोरेंमोरें ॥ गुंते० ॥ २ ॥
थोर मनाचे निष्पापीजन ह्मणतिल ह्याला काय!
पण मज आतां स्वप्नांत हि ती रमणी दुर्लभ; हाय! ॥ गुं० ॥ ३॥
धीर धरीं रे मना जरा तूं धीर धरीं पण कोण ॥
तरुण धन्य तो करिल तिच्या कीं अधररसाचें पान! ॥ गुं॥ ४ ॥

---

## पुष्पमंजिऱ्या.

पद.

( राग सारंगाचा जिल्हा. )

रमणीय मंजिऱ्यांनो हे ॥ स्थिति तुमची अद्भुत गमते ॥ ध्रु० ॥
सुंदरिनो ठेवण तुमची ॥ किति सुरेख कोमल कांती ॥
होणार सफल तरुवर कीं ॥ त्यांच्या तुह्मि अग्रिम दूती ॥
परि अशा त्वरित कां गळुनी ॥ जाता गे तोडुनि प्रीती ॥
॥ चाल ॥ इतक्यांत दिवस बहारीचे ॥
संपले असें हि न तुमचे ॥
मुसमुशीत भर नौतांचें ॥
क्षण हे चि अमोलिक शुभ ते ॥ रमणीय० ॥ १० ॥

आणवीं काहि तरि दिन हो ॥ पावुनियां समनिं विकास ॥
कलिकांनीं मुकुलित वदनें ॥ सविनोद करुनि मृदु हांस ॥
सुखविलास भोगुनि ऐसे ॥ मग जावें निजधामास ॥
॥ चाल ॥ मोहुनी च क्षण पल घटिका ॥
लावुनी मनाला चटका ॥
जावयास तोडुनि तटका ॥
आलांत काय जन्मातें ॥ रमणीय० ॥ २ ॥
शिव शिव! हे कैसी करणी ॥ काय ह्या ह्मणावें विधिला ॥
अति रुचिर मनोहर तुमचें ॥ पाडुनि सुगुण दृष्टीला ॥
एकदम अगोचर करुनी ॥ टाकावें काय तुह्माला? ॥
॥ चाल ॥ जणुकाय वीज आकाशीं ॥
लखलखते क्षणिक प्रकाशीं ॥
तेवि या जगीं भ्रमण्याशी ॥
निर्मिलें चि काय तुह्मातें ॥ रमणीय० ॥ ३ ॥
परि अशी विलक्षण स्थिति हे ॥ अवलोकुनि तुमची वाटे ॥
जणुकाय रम्य श्लोकांच्या ॥ पंक्ति तुह्मी बोधा थाटें ॥
"कीं अहो अशाश्वत सारें" ॥ "समजा हें वैभव खोटें" ॥
॥ चाल ॥ "कोणती किती बरवी ही" ॥
"ती असो वस्तु मनमोही" ॥
"जाणार चि संशय नाहीं" ॥
"सत्यैक ब्रह्म केवळ तें" ॥ रमणीय० ॥ ४ ॥

---

## शेंवतीचा बहार.

पद

( साध्याएकतालीं लावणीची धाटी )

बहारींत काय अहा! रम्य शेंवती ॥
विकच सुमनभूषणीं च फांकली गुती ॥ ध्रु० ॥

उंच निराधार अंतराळिं अंबरीं ॥
   संचारति चोंहिकडे मेघ त्या परी ॥
एकटा च खोरिदरीं विकट डोंगरीं ॥
   परिभ्रमत असतां मी एक अवसरीं ॥
कुसुमश्री दिसली मज अकस्मात ती ॥ वहा० ॥ १ ॥

   रुचिर रुक्मवर्ण सघन सुमनवृंद हा ॥
निर्मल जल सरसीतटिं तरुतळीं पहा ॥
   मंद शीत पवनसुखोल्लसितमन अहा! ॥
डोलतसे लहरि माजि गर्दिनें महा ॥
   सुरनदींत भगण तेवि झगमगे अती ॥ वहा० ॥ २ ॥

अविच्छिन्न हा प्रफुल्ल ताटवा असा ॥
   भूषवि त्या जलाशया हेमकांचि सा ॥
अथवा जरिकांठ नील अंबरा तसा ॥
   प्रतिबिंबित इंद्रचापपरिधि मानसा ॥
भुलवि नेत्र दिव्य पुष्पथाट तो किती ॥ वहा० ३ ॥

   तडागींच्या दीप्त चपल लहरिनर्तनीं ॥
हर्ष गमे परि हि तुच्छ ह्या सुदर्शनीं ॥
   अशा शौकि चैनी मंडळास पाहुनी ॥
आनंदें कवि न काय जाय मोहुनी ॥
   निरखुन मी पुनःपुन्हा पाहिं मौज ती ॥ ॥ वहा०॥४॥

हा अलभ्य लाभ अनिर्वाच्या जो मला ॥
   विकसित छविदर्शनांत अतुल जाहला ॥
तो अपूर्व मन्मनास पूर्विं वाटला ॥
   त्याहुन ही आज सरस सुखद आगळा ॥
अदृश्य तरि मूर्तिमंत गुंग करि मती ॥ वहा० ॥ ५ ॥

चिंतातुर खिन्न हृदयिं सुन्न होउनी ॥
मंचकिं जों पहुडें मी आंग टाकुनी ॥
तों ही अति सुंदर छवि ध्यानिं येउनी ॥
दृष्टिपुढें राहि उभी शांतिदायिनी ॥
होई मग तल्लिन मन, मोहिनी च ती! ॥ बहा० ॥ ६ ॥

ज्ञाननयनिं अवलोकन लक्ष्य वस्तुचें ॥
हें चि परम सौख्य एकांतवासिचें ॥
अद्भुत सौंदर्य सजल पुष्पराईचें ॥
दृष्टिपुढें येतांक्षणिं तें बहारिचें ॥
मोहें धीर मन्मन ही चाह केलि ती ॥ बहा० ॥ ७ ॥

हें सुरम्य छविदर्शन स्मरण होउनी ॥
अत्यद्भुत विधिकौशल येतसे मनीं ॥
रंग रूप रुचि गुणादि विविध कारणीं ॥
असे चि प्रत्येक वस्तु चित्तहारिणी ॥
सृष्टिचमत्कृतिमहिमा वर्णवे किती ॥ बहा० ॥ ८ ॥

---

## लग्नाची हौस.

### अभंग.

वय पंनाशी लोटली ॥ दशा साठीची थाटली ॥ १ ॥
वृद्धावस्था आली तरी ॥ हौस लग्नाची अंतरीं ॥ २ ॥ ध्रु० ॥
हस्त पाद श्रोत्र नेत्रें ॥ शक्तिहीन झालीं गात्रें ॥ ३ ॥
केशीं जातां निज तेज ॥ परागंदा होतां द्विज ॥ ४ ॥
झालें तोंडाचें बोळकें ॥ हनू नासा घेती मुके ॥ ५ ॥
मुखीं अस्पष्ट भाषण ॥ ऐकूं कंटाळले कान ॥ ६ ॥

रूपीं वैगुण्य देखोनी ॥ मांद्य घेतलें लोचनीं ॥ ७ ॥
पोट अन्न पचविना ॥ लढे त्याशीं तोफखाना ॥ ८ ॥
कृतांताच्या शुभ्र ध्वजे ॥ पाहुनियां काया धुजे ॥ ९ ॥
कोठें गेलें तें यौवन ॥ शोधी कंबर वांकून ॥ १० ॥
शक्ति त्रासोनी व्याधिला ॥ गेल्या शरण यष्टीला ॥ ११ ॥
काळचोराच्या भीतीनें ॥ खळ स्वीकारिला मनें ॥ १२ ॥
पुत्र पौत्र लेंकी सुना ॥ वेल विस्तारला दुणा ॥ १३ ॥
नसे इनाम वेतन ॥ वृत्ति मिरास वतन ॥ १४ ॥
संसार तो हातावर ॥ चालविणें निराधार ॥ १५ ॥
तरी देवोनियां हुंडी ॥ मूल अल्पवयी खंडी ॥ १६ ॥
ऐशीं लग्नें झालीं सात ॥ तरी आठव्याचा बेत ॥ १७ ॥
पंत ह्मणे अविचार ॥ किती विषयाचे चार ॥ १८ ॥

---

## कसोटी

### अभंग.

योग्यता सोन्याची घर्षणाच्या पोटीं ॥ दाविते कसोटी पाषाणाची ॥ १ ॥
योग्यता कळते कोण्या ही वस्तुची ॥ जेणें, तेचि त्याची कसोटी हो ॥ २
कसोटी नराच्या कुलीनपणाची ॥ आणि निश्चयाची दरिद्रता ॥ ३ ॥
जितेंद्रियपणा येतसे कळून ॥ विषयदर्शनकसोटीनें ॥ ४ ॥
ज्ञान समतेच्या विद्या सन्नीतीच्या ॥ मैत्री स्वापत्तीच्या कसीं कळे ॥ ५
धैर्य संकटानें शौर्य संग्रामानें ॥ थोरि सचोटीनें कळतसे ॥ ६ ॥
नलगे विस्तार थोड्यांत चि फार ॥ उमजावें सार ह्मणे पंत ॥ ७ ॥

---



# श्रीमंत महाराज शिवाजीराव होळकर यांच्या गादीनशीनीच्या महोत्सवप्रसंगीं

## प्रजेकडून मुबारिकबादी.

पद. १.

( राग कल्याण; चाल साधी एक ताली )

देत मुबारिकबादि प्रजा ही श्रीमत्सिंहासनीं ॥
शिवाजी राव तुह्मां पाहुनी ॥ ध्रु० ॥
थोर सनातन वैभवशाली गादी ही नरवरा ॥
अभिमत होवो श्रेयस्करा ॥
ऋद्धि सिद्धि सद्बुद्धि निरंतर नांदो कमला स्थिरा ॥
चिरायू राज्य करीं महिवरा ॥
विजयश्री तव सबल भरारो कांपो रिपु थरथरा ॥
सुकीर्ती जाओ देशांतरा ॥
चाल ॥ जाहली अहल्या माउलि कीर्तीकरा ॥
त्या वंशिं शोभसी कुलदीपक मोहरा ॥
सुखवितां जनां चिंतामणि होशी खरा ॥
हर्षद सकलां भाग्योदय हा मित्रांबुजभावनी ॥
शिवाजी राव तुह्मां पाहुनी ॥ देत० ॥ १ ॥

पद. २

( राग कल्याणाचा जिल्हा )

महेशा सदया ॥ सुखि राखि शिवाजी राया ॥ ध्रु० ॥
वरराज्यसौख्यवैभवीं ॥ जयवंत सुचिर नांदवीं ॥
निरामय काया ॥ सुखि० ॥ १ ॥
हा अहा! प्रजेवर धनी ॥ न्यायनीतिबलसाधनी ॥
करो स्थिर छाया ॥ सुखि० ॥ २ ॥
गुणि चतुर बुद्धिचा हिरा ॥ प्रभु अजातरिपु मोहरा ॥
गाजवी यशि या ॥ सुखि० ॥ ३ ॥
सर्वोपरि आमुच्या नृपा ॥ भूपवीं ठेवुनी कृपा ॥
वंदितों पायां ॥ सुखि० ॥ ४ ॥

---

श्लोक ३.

मानूं भानु तरी न तापद अहा! आल्हादवी लोचन ॥
वारी ताप सुधांशु तो हि न गमे कांहीं न ज्या लांच्छन ॥
अग्नी दिव्य चि हा ह्मणूं तरि न कीं संस्पर्शनी जाळित ॥
तेजःपुंज शिवाजिराज नृपती शोभे असा अद्भुत ॥

---

तारीख ३ जुलै सन १८८६ इसवी.

---

## मातीचें ढेकूळ.

### आर्या.

एके दिवशीं एका जागीं म्या एक पाहिली गुटिका ॥
वर्णूं सुगंध बरवा काय तिचा अन्य ज्या पुढें लटिका ॥ १ ॥
पुसलें तिला कवण तूं कस्तुरि कीं काय सत्य सांग मला ॥
मधुर सुवास किती तव मोहीं हा जादु मन्मना गमला ॥ २ ॥

तो ती वदे, न कस्तुरि मी आहें क्षुद्र गोळि मातीची ॥
परि मज घडली होती संगति हो दीर्घ काळ जातीची ॥ ३ ॥
तेणें करून जडला तत्सुमनाचा सुवास हा मजला ॥
ना तरि निपट असे हा मृन्मय मदेह वस्तुता सजला ॥ ४ ॥

---

## उलटी रीत.

### पद.

( राग. जोगी. साकीची धाटी. )

अगुण हि थोरीं गुण गणिती ॥ ऐशी जन रीती ॥ ध्रु० ॥
सर्वस्वी तनु परार्थ वेंची मेष त्यास सोडून ॥
निर्दय हरिला ह्मणती राजा जो खाई फाडून ॥ ऐशी० ॥ १ ॥
व्याघ्रवृकादिक यांहीं हिंसा करितां ठेविति नांवें ॥
कर्म तें चि मनुजांचें भोजन मखादिकीं वानावें ॥ ऐशी० ॥ २ ॥
बळें परांचें वित्त हिरावुन घेतां चोरी निंद्य ॥
राजरोष बळकाविति नृप परराष्ट्रादिक तें वंद्य ॥ ऐशी० ॥ ३ ॥
स्वहित साधण्या प्रजादिकांहीं देतां धन तो जाणा ॥
राजसेवकां लांच होय परि राजाला नजराणा ॥ ऐशी० ॥ ४ ॥

---

## अंतकाळींचा लोभ.

### अभंग.

सदा दीनवाणा उपभोगाविण ॥ संपादितां धन झाला वृद्ध ॥ १ ॥
कालनिमंत्रण आलें जरी सत्वर ॥ प्रपंचीं असक्त लोभीमन ॥ २ ॥
झाला सन्निपात कासाविस प्राण ॥ आयास दारुण प्रयाणींचे ॥ ३ ॥
जीभ ओढलीसे बसे दांतखीळ ॥ जाहली विकळ गात्रें सारीं ॥ ४ ॥
चंद्री लागोनिया लोटे एक एक ॥ ॥ क्षण अमोलिक संकटांत ॥ ५ ॥
ऐशा काळवेळीं न निघे शब्द हीं ॥ तरी बोलूं पाही प्रयासानें ॥ ६ ॥
"वा-वा-के-के" ऐशीं अक्षरें त्रुटित ॥ बोलोनियां हात लावी भाळा ॥ ७ ॥

अस्पष्ट ह्या बोलें कोणी तर्क केला ॥ इच्छी सांगायाला गुह्य कांहीं॥ ८॥
किंवा दानधर्म करायाचा हेत ॥ असेल मनांत कांहीं तरी ॥ ९ ॥
इच्छा कोणती ही न राहो शेवटीं॥आणी ऐसें पोटीं पुत्र तेव्हां ॥ १० ॥
ह्मणे सांगाल तें देतों वैद्य बोवा ॥ तातातें बोलवा कैसें तरी ॥ ११ ॥
मग दांतखीळ पळीनें वासोनी ॥ मात्रा संजीवनी चाटविली ॥ १२ ॥
ऐशा कष्टोपायीं ये कांहीं शुद्ध तो ॥ मुलाला बोलतो "रांडलेका" १३
"वा-वा-वासरूं तें के-के केरसूणी"॥"खातें कां ती कोणी उचलाना"॥ १४
इतुकें बोलोनी पंचत्व पावला ॥ काय स्वार्थ केला ह्मणे पंत ॥ १५ ॥

## कंठाळ.

### आर्या

प्रत्येक मनुष्याच्या खांद्या वर सर्वकाळ पडलेली ॥
कंठाळ दोन आंखी असते दोषांहिं पूर्ण भरलेली ॥ १ ॥
परदोष पुढिल आंखीं मागिल आंखीं स्वदोष असतात ॥
यास्तव निज दोष न ते मनुजा परदोष मात्र असतात ॥ २ ॥

## विनोदपर चुटके.

### श्लोक.

वस्तु एक असून दोन दिसणें कांचिद्विकारें असा ॥
कोणी रुग्ण चिकित्सका जवळ ये ठेवूनिया लालसा ॥
तों ता वैद्यचि त्या पुसे कुणिकडे आलां तिघे कासया ॥
रोगी ऐकुनि हें हताश उठुनी लागे घरीं जावया ॥ १ ॥

कोणी नीतिकथा कथीत असतां लोकांस लोकोत्तरी ॥
त्याला कोणि ह्मणे "किती सुजनता त्वां बोधिली ही तरी" ॥
"धैर्याचें प्रतिबिंब शुद्ध दिसतें तोंडिं तुझ्या आगळें" ॥
बोले हा "मज आज मन्मुख असे आदर्श हें कां कळे" ॥ २ ॥

एका मानि धनी समीप परकी कोणी कवी येउनी ॥
बैसे कीं उभयांत दोन चि तसूं जागा असा खेटुनी ॥
तों त्या मानि ह्मणे " तुह्मी व खर यां मध्यें किती अंतर" ॥
" सारे दोन तसूं " ह्मणून कवि त्या तत्काळ दे उत्तर ॥ ३ ॥

---

कोणी करीं घेउनि रूळ थोर ॥ बोले "बघा थेट चि ह्या समोर" ॥
"टोंका कडे एक उभा लबाड" ॥ " तें कोणतें टोंक " पुसे लबाड ॥ ४ ॥

---

माता मुलास उपदेश करी बजावी ॥
कीं आजचें न कधि काम उद्यांस ठेवी ॥
बाळ्या ह्मणे " तर बये चल ऊठ जाऊं" ॥
" पोळ्या घरा मधिल आज चि सर्व खाऊं " ॥ ५ ॥

---

कोणी गृहस्थ पथिं चालत घाइघाई ॥
तों त्या समोर दुसरा शठ आड येई ॥
" दे वाट " हा ह्मणत तो " न जडास देंं मी " ॥
" मी देतसें " ह्मणुन बाजुस हा चि होई ॥ ६ ॥

---

बोले कारकुनास कोणि कुणबी " दादा पाह ती सुरी " ॥
" कोठें ! आण बघूं " ह्मणून ह्मणतां तो त्यास दावी करीं ॥
" वेड्या, काय हिला सुरी ह्मणति रे, ही लेखणी बोलती " ॥
" बोला कांहिं तुह्मी परंतु अमुचे कापी गळे ही च ती " ॥ ७ ॥

---

मित्रा एक भुजंग म्यां बधितला अत्यंत तो लांब रे ॥
बोले मित्र तया " किती तरि असा तो लांब होता बरें " ॥
सांगे हा जणु तोंड तें बघ तुझ्या तेथें इथें शेप ती " ॥
" ह्मां हां तोंड! अरे, करीं पलिकडे " तों तो ह्मणे त्याप्रती ॥ ८ ॥

---

[illegible] बोलतो यवन कीं " द्रव्यार्थ हिंदू तुह्मी ॥
[illegible] पहा, परंतु शठतों अब्रू च साठीं अह्मी " ॥
हिंदू बोलत " हें खरें च; अमुच्या पाशीं न कीं द्रव्य तें ॥
अब्रू तेवि नसे तुह्मां ह्मणुन तीं हो लभ्य सें वाटतें " ॥ ९ ॥

---

एका पंगु नृपाकडे चतुर ये वेश्या परी अंध ती ॥
" आख्या काय ! " विचारितां वदत ती " लक्ष्मी प्रभो बोलती " ॥
" लक्ष्मी नाम ! " पुसे नरपती " ती काय अंधा अशी ! " ॥
" अंधा ती ह्मणुनी च पंगुगृहिं ये " दे जाब ती त्याजशी ॥ १० ॥

---

कोणी एक अनाथ पोर अपुल्या काकासवें चालला ॥
होता तों अवचीत एक कुतरा त्यांनीं पथीं पाहिला ॥
काका बोलत " रे अशक्त दुबळा कुत्रा किती हा तरी " ॥
बोले कीं पुतण्या " असेल अपुल्या काकाचिये तो घरीं " ॥ ११ ॥

---

कोणी धूर्त जनें प्रसिद्ध करिकीं " मी मुख्य आहे खुदा " ॥
" कां हें ढोंग ! तुला न ठावि परता शिक्षा कशी कष्टदा ॥
त्या ढोंग्या पयगंबरीप्रकटका केली ! " वदे त्या शहा ॥
" झालें ठीक चि तें " ह्मणे ठक " न तो मद्दूत होता पहा " ॥ १२ ॥

---

घोडा अडे कां सडतात पानें ॥ कां ही जळे भाकर विस्तवानें ॥
कोणी वदा एक चि उत्तरानें ॥ एका अहो वेळि न फेरल्याने ॥ १३ ॥

---

समाप्त